


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

वर्ष ३२ । अंक ४
दिवाळी २०१४
विद्वत्प्रमाणित त्रैमासिक
(Refereed Journal)



भाषा आणि जीवन
मराठी अभ्यास परिषद पत्रिका

आपण समजं करू. हे म्हणतात वगैरे ते सगळं. थेट इतकी वर्षं अशी उदाहरणार्थ काढलीच की नाही? आणि आणखीही थेट वर्षं काढायची घमेंड वगैरे आहे. आपण कुणा दुसऱ्याची वगैरे वर्षं चोरणार नाही किंवा कुणाच्या बापाचा पैसा वाया घालवणार नाही. वय गेलं असं हे अवांतर म्हणतात. ते मात्र उदाहरणार्थ बरोबर नाही. आणखी पुढे नाना वर्षं आहेतच. वर्षं नीट असतातच. आपण उदाहरणार्थ किती का उशिरा उठतना? त्या मानानं कसं का वागतना? आपापली वर्षं पुढे अमुक शिल्लक असतातच. ती वगैरे काही कमावता येत नाहीत. तेव्हा गमावली ही भाषा मात्र उदाहरणार्थ इतकी बरोबर नाही. किंवा वर्षं अत्यंत वाया गेली, असं म्हणणं उदाहरणार्थ चूक आहे. म्हणजे बरोबरच.

'कोसला'
(भालचंद्र नेमाडे)



अनुक्रमणिका

**संपादक :** प्र०ना० परांजपे

**संपादन-समिती :** प्र०ना० परांजपे (प्रमुख), विजय पाध्ये, आनन्द काटीकर, सरोजा भाटे, सलील वाघ, विजया चौधरी.

**लेख पाठविण्यासाठी आणि संपादकीय पत्रव्यवहारासाठी :** प्र०ना० परांजपे, एच् - 1, क्लॅरियन पार्क, औंध टेलिफोन एक्स्चेंजजवळ, पुणे 411 007.

चलभाष : 09422509638 ई-पत्ता : pranaparanjpe@gmail.com

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनन्द काटीकर, बी-5/16, सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411 051. चलभाष : 094216 10704

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 095459 50808 **विजय पाध्ये** - 098220 31963. marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) **वार्षिक वर्गणी**

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | **₹ १५०/-** | **₹ ४००/-** | **₹ ७००/-** |
| **संस्था :** | **₹ २००/-** | **₹ ५५०/-** | **₹ ९००/-** |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/-+ नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **(आयएफएस संकेत क्र० MAHB 0000041) बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/ शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन :** त्रैमासिक; हिवाळा (जाने०-मार्च), उन्हाळा (एप्रिल-जून), पावसाळा (जुलै-सप्टें०), दिवाळी (ऑक्टो०-डिसें०)

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

# अनुक्रमणिका

## आदरांजली

### डॉ० म०द० हातकणंगलेकर

डॉ० म०द० हातकणंगलेकरांचे वयाच्या ८८व्या वर्षी निधन झाले. सांगली येथे भरलेल्या ८१व्या साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. विलिंग्डन महाविद्यालयाचे (सांगली) प्राचार्यपद त्यांनी अनेक वर्षे भूषविले. ते जाणकार समीक्षक होते. जी०ए० कुलकर्णी यांच्या पत्रांचे त्यांनी संपादन केले. मराठी व इंग्रजीमध्ये त्यांची १५हून अधिक पुस्तके प्रसिद्ध झाली होती.

### सरिता पदकी

कवयित्री सरिता पदकी यांचे अमेरिकेत निधन झाले. कवितेव्यतिरिक्त नाटक, कथा, बालवाङ्मय असे इतरही वाङ्मयप्रकार हाताळले.

### पद्मजा फाटक

सुप्रसिद्ध लेखिका पद्मजा फाटक यांचे पुणे येथे निधन झाले. त्यांचे विनोदी लेखन विशेष प्रसिद्ध असले तरी चरित्रलेखन (ताराबाई मोडक), आत्मकथन (हसरी किडनी) आणि विज्ञानेतिहास (बाराला दहा कमी) अशा अन्य प्रकारचे लेखनही त्यांनी केले.

### सरदेसाय, माधवी

मराठी अभ्यास परिषदेच्या आजीव सभासद, 'भाषा आणि जीवन'च्या लेखिा. 'जाग' या कोंकणी मासिकाच्या संपादिका. स्वतंत्र लेखन व भाषांतर यांसाठी साहित्य अकादेमीची दोन पारितोषिके. गोवा विद्यापीठातील कोंकणी विभागातील प्राध्यापक. कर्करोगाशी दिलेल्या दीर्घ झुंजीनंतर काही महिन्यांपूर्वी निधन झाले.

### सुधीर मोघे

कवी, गीत व संगीतकार सुधीर मोघे यांचे मार्च २०१४मध्ये अचानक निधन झाले.

### सुमन बेहेरे

'माहेर' मासिकाच्या मालक, संपादक सुमन बेहेरे यांचे अलीकडेच निधन झाले.



## अभिनंदन

या वर्षी भारतीय ज्ञानपीठाने आपल्या वार्षिक पारितोषिकासाठी भारतीय भाषांपैकी मराठी भाषेतील लेखक डॉ० भालचंद्र नेमाडे यांची निवड केली आहे. वि०स० खांडेकर, कुसुमाग्रज व विंदा करंदीकर यांच्यानंतर ज्ञानपीठ पारितोषिकाने सन्मानित झालेले नेमाडे हे चौथे मराठी लेखक. त्यांच्या 'कोसला' (१९६३) या कादंबरीने मराठी साहित्यात शैली, वृत्ती, विषय आणि नायक-प्रतिमा याबाबतीत क्रांती घडवून आणली. त्यांचा देशीवादाचा आग्रह, 'लेखकाचा लेखकराव कसा होतो?' हा लेख, स्पष्ट व निर्भीड मते यांमुळे ते वादग्रस्त ठरले आहेत. गेल्या साठ वर्षांतील तरुण मराठी वाचकांच्या निदान तीन पिढ्या 'कोसला'ने विलक्षण प्रभावित झाल्या. त्यांची 'हिंदू' भारतीयांचा इतिहास आणि भूगोल एकात्मिक कथनाच्या कवेत घेण्याचा प्रयत्न करीत आहे.

२०१३मध्ये 'मराठी अभ्यास परिषदे'च्या वार्षिक सभेत 'ज्ञानपीठ पारितोषिक मराठी भाषेत कुणाला मिळावे?' या विषयावर चर्चा ठेवण्यात आली होती. त्या वेळी फक्त नेमाडेंच्याच नावाची सूचना करण्यात आली होती.





अनुक्रमणिका

# इथे गंजलो मी

इथे गंजलो मी गळाली झळाळी
कळे काहुराचे उरी म्लान झाले
कुठे वाट हुंगावयाची कळेना
असे पाय माझे इथे स्तब्ध झाले.

फणा वीष पेलून उंचावणारी
तशी वाट डोळ्यांत खेळे घुमारा
खुणा पावलांच्या दिसेनात कोठे,
स्फुरे पापणीशी धुळीचा पिसारा.

किती सोडवील्या मिठ्या वेदनांच्या
कळेना कळेनाच पीडा मनाला
गिळू पाहिले दुःख दुःखार्त झालो
मला पंख मारून अंधार गेला.

सदा हाक मारीत आलो सुखाला
असा हिंडलो फोड घेउनी पायीं
इथे तोल गेला अशा सुन्न वेळी
मला फेर घालून गेल्या दिशाही.

अहो माझिया पावलांच्या कपाळी
व्यथा धुंडणारी अशी वाट आली !

- भालचंद्र नेमाडे

['उन्मेष' या फर्ग्युसन महाविद्यालयातील 'साहित्यसहकार' या संस्थेच्या सभासदांच्या कवितासंग्रहातून. (प्रकाशन १९६०)]

# मराठी भाषाविषयक धोरण

- प्र० ना० परांजपे

येत्या पंचवीस वर्षांसाठी - म्हणजे इसवी सन २०४०पर्यंत महाराष्ट्र शासनाचे भाषाविषयक धोरण काय असावे यासंबंधी शिफारस करण्याचे काम शासनाने आपल्या भाषा सल्लागार समितीकडे सोपवले. या समितीवर एकूण २९ सदस्य आहेत. पैकी २१ सदस्य अशासकीय आहेत आणि उरलेले आठ सदस्य शासनातील पदसिद्ध अधिकारी आहेत. अर्थात भाषाविषयक सल्ला देण्यासाठी या समितीत एकही भाषावैज्ञानिक नाही ही गोष्ट अलाहिदा. (अर्थात या सगळ्या सभासदांची सर्व माहिती मला आहे असे नाही. त्यामुळे या विधानात काही चूक असेल मी दिलगीर असेन.) त्या समितीत मराठीचे (व इतरही काही विषयांचे) प्राध्यापक बहुसंख्य आहेत. काही ललित लेखक आहेत. (आपल्याकडे अशी एक समजूत आहे की एखादा लेखक (किंवा पत्रकार) प्रसिद्ध झाला, त्याला मानसन्मान, पारितोषिके मिळाली आणि तो वयाने ज्येष्ठ झाला की तो सर्व साहित्यिक, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रांत सर्वज्ञ आहे, निदान तज्ज्ञ आहे असे समजले जाते. आणि तोही आपल्या मगदुराप्रमाणे यच्चयावत विषयांबद्दल आपल्या मतांचा बटवडा करत राहातो!) पण भाषा आणि भाषिक प्रश्न यांचा शास्त्रशुद्ध अभ्यास केलेले निदान एकदोन भाषावैज्ञानिक या समितीत असावेत असे सरकारला वाटले नाही? असो! तर भाषाविषयक धोरणासंबंधी या समितीने चर्चा केली, वेगवेगळ्या शहरांत सहा 'सहविचार' सभा घेऊन उपस्थित मंडळींची मते जाणून घेतली आणि मग धोरणाचा मसुदा तयार करण्यासाठी सहा सदस्यांची एक उपसमिती नेमली. त्या समितीच्या अध्यक्षपदी डॉ. नागनाथ कोत्तापल्ले होते. (ते माजी संमेलनाध्यक्ष व कुलगुरू आहेत, हे मी सांगायला नको.) उरलेल्या पाच सभासदांपैकी चार सभासद मराठीचे प्राध्यापक व एक सामाजिक विचारवंत आहेत. हे सर्व सभासद आपापल्या परीने व्यक्तिगत पातळीवर नावाजलेले अनुभवी विद्वान आहेत. पण त्यांनी तयार केलेला मसुदा वाचून इंग्रजीतील एक म्हण आठवते - बल्लवांची संख्या वाढली की आमटी बिघडते! (टू मेनी कुक्स स्पॉइल द ब्रॉथ)

या मसुद्यात सात प्रकरणे व एक परिशिष्ट आहे. डबल क्राउन आकाराची ६४ पाने! पण त्यात वैचारिक गोंधळ, पुनरुक्ती आणि ऱ्हस्व दृष्टीचा प्रभाव दिसून येतो. आपण ज्या सद्य:स्थितीचे वर्णन केले आहे तिच्यावरची काही उपाययोजना सुचविली आहे का, हे पाहिले गेलेले आहे असे नाही. उदाहरणार्थ, प्रसार माध्यमांबाबतच्या सद्य:स्थितीत

वृत्तपत्रांतील भाषा सदोष असते, वृत्तसंस्था (हा शब्द मसुदालेखकांना माहीत नाही की काय अशी शंका येते. कारण त्यांनी 'प्रेस ट्रस्ट ऑफ इंडिया' व 'तत्सम अशा संस्था' असा वर्णनापर शब्दसमूह वापरला आहे!) आपली वार्तापत्रे फक्त इंग्रजी व हिंदीमध्ये पाठवतात व त्यामुळे चुकीचे प्रस्तुतीकरण, दिशाभूल करणारे भाषांतर इ० प्रश्न निर्माण होतात'' असे म्हटले आहे. मात्र प्रसारमाध्यमांसंबंधीच्या शिफारशींमध्ये यावर उपाय सुचवण्यास मसुदालेखक विसरले आहेत. यासंबंधी 'भाषा आणि जीवन'ने दहा वर्षांपूर्वी (वर्ष २२, अंक ४, दिवाळी २००४) मराठी वृत्तसंस्थेच्या आवश्यकतेसंबंधी संपादकीय लिहिले होते! 'एखादी मध्यवर्ती मराठी वृत्तसंस्था खासगी-शासकीय सहभागातून निर्माण करणे' हे धोरण त्या सद्य:स्थितीवरचा उपाय म्हणून नमूद करणे शक्य होते.

आपण शासनासाठी मराठी भाषाविषयक धोरण तयार करत आहोत हे लक्षात घेऊन मसुद्याची भाषा लिहिली गेली आहे असे दिसत नाही. ''...या दिशेने महाराष्ट्र शासनाने प्रयत्न करावेत'', ''... बंधनकारक केले जाते'' अशी भाषा या मसुद्यात आढळते. याऐवजी धोरण म्हणून ही भाषा... या दिशेने प्रयत्न करणे''. ''...बंधनकारक करणे'' अशी असायला हवी. आणि हे धोरण शासनासाठी तयार केले जात असल्यामुळे ''शासनाने प्रयत्न करावेत'' असे वेगळे म्हणण्याचे कारण नाही. किंबहुना उद्देश व धोरण-विषयक शिफारशी यात नेमका काय फरक आहे हे मसुद्यावरून कळत नाही.

मसुद्याच्या भाग तीनमध्ये एकूण ३९ उद्दिष्टांची नोंद करण्यात आली आहेत. पण त्यात भरपूर पुनरुक्ती आहे. त्यांचा क्रम अतार्किक आहे. उदाहरणार्थ, ''मराठी भाषेसमोरील आव्हाने कोणती आहेत याचा शोध घेऊन त्यावर उपाययोजना सुचविणे'' या उद्दिष्टाचा क्रम २६वा आहे! खरे म्हणजे संपूर्ण धोरणाचे हेच प्रमुख (आणि कदाचित एकमेव) सर्वसमावेशक उद्दिष्ट असल्यामुळे त्याचा क्रम पहिला असायला हवा!

उद्दिष्टे व धोरण यांमध्ये मसुदा समितीला फरक करता आलेला नाही, त्याचप्रमाणे धोरण व त्याची अंमलबजावणी यांमध्ये काही फरक आहे असे मसुद्यावरून जाणवत नाही. 'मराठीसाठी वेगळे विद्यापीठ स्थापन करणे' हे झाले धोरण. पण हा मसुदा त्या विद्यापीठाला लागणारी जमीन, प्राध्यापक, अन्य कर्मचारी, रचना अशा अंमलबजावणीच्या तपशिलांना धोरणात समाविष्ट करतो. ही शिफारस शासनाने मान्य केली तर शासन त्यासाठी वेगळी समिती नेमील व ती समिती त्याबद्दलच्या तपशीलवार शिफारशी करील हे नि:संशय!

शिफारशींच्या अंमलबजावणीचा कालावधी निश्चित करतानाही फारसा गंभीर विचार झाला असावा असे वाटत नाही. शालेय शिक्षणासंबंधीच्या १४ शिफारशींपैकी फक्त दोन शिफारशींसाठी दहा वर्षांचा कालावधी दिला आहे. बाकीच्या सर्व शिफारशींसाठी ''त्वरित ते तीन वर्षांचा कालावधी'' ठरविण्यात आला आहे. या शिफारशी ''त्वरित ते तीन''

वर्षे एवढ्या कालावधीत अमलात आणणे व्यवहारत: शासनाला शक्य होईल असे मसुदालेखकांना खरेच वाटते का? आपले लोकशाही शासन आर्थिक व अन्य मर्यादा पाळून एवढ्या अल्प कालावधीत या शिफारशी अमलात आणू शकेल?

या शिफारशींपैकी एक शिफारस अशी आहे की तिला हसावे की तिची कीव करावी हे समजत नाही. ती शिफारस म्हणते की- ''इंग्रजी माध्यमातून शिक्षण घेणाऱ्या मराठी विद्यार्थ्यांना इंग्रजीबरोबरच मराठीतून देखील विषय समजावा यासाठी अभ्यासक्रमाची पुस्तके इंग्रजी व मराठी अशा दोन्ही **भाषेत** असावीत.'' (मुळाबरहुकूम) हा द्राविडी प्राणायाम कशासाठी? ज्या शाळांत मुलांनी आपसात किंवा शिक्षकांशी मराठीतून बोलायला सुद्धा बंदी असते त्या शाळांतील मुलांसाठी इंग्रजीबरोबरच मराठी भाषेतही पुस्तके तयार करायची! समजा केली तर ती वापरणार कोण? मुलांना इंग्रजी यावे म्हणून पालकांनी त्यांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांत घातलेले असते. त्यांना शिक्षक व पालक मराठी पुस्तके वापरू देतील? की पालकांनी मुलांना बिनधास्तपणे इंग्रजी माध्यमाच्या शाळांत पाठवावे असा या धोरणकर्त्यांचा उद्देश आहे?

शालेय शिक्षणासंबंधी नववी शिफारस म्हणते की केंद्र शासनाने सुरू केलेल्या नवोदय विद्यालयांच्या धर्तीवर राज्य शासनाने ''अद्ययावत सोयीसुविधांसह व प्राथमिक पातळीपासून प्रत्येक जिल्ह्यात एक अशी शाळा सुरू करावी.'' म्हणजे असलेल्या शाळांना अद्ययावत सुविधा द्यायच्या की अद्ययावत सोयीसुविधा असलेल्या नवीन शाळा सुरू करायच्या? अशा शाळा सुरू करणे विद्यार्थ्यांत भेदभाव करणे ठरणार नाही का? केंद्र शासनाने ज्याप्रमाणे उच्च शिक्षणात आयआयटी, आयआयएसई, सेंट्रल युनिव्हर्सिट्या अशी (तथाकथित) उत्कृष्टतेची बेटे निर्माण करून बहुसंख्य राज्य विद्यापीठांना वाऱ्यावर सोडले आहे, त्याचेच शालेय पातळीवर अनुकरण करण्यासच ही शिफारस सुचवीत नाही का? शिवाय सगळ्या जिल्ह्यांत अशी विद्यालये सुरू करायची म्हणजे इमारती, क्रीडांगणे, वसतीगृहे, शिक्षक, त्यांचे पगार इ० पायाभूत सोयी निर्माण करण्यासाठी किती खर्च येईल? त्यापेक्षा सध्याची विद्यालये सुधारणे सोपे व कमी खर्चाचे नाही का? आजसुद्धा खासगी शाळांपैकी निदान शंभर शाळा उत्तम दर्जाच्या आहेत. त्यांच्या प्रयोगांचे व अनुभवांचे सार्वत्रिकीकरण करण्याचे धोरण जास्त फलदायी ठरणार नाही का?

शिक्षणाचे शिशुवर्ग, प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण, उच्च माध्यमिक शिक्षण व उच्च शिक्षण असे निदान पाच टप्पे असतात. त्यापैकी शिशु शिक्षणाचा मसुद्यात उल्लेखच नाही! त्या टप्प्यावर मुले 'बाबा ब्लॅकशिप' अशी गाणी शिकतात आणि त्यामुळे त्यांचे मानसिक व बौद्धिक खच्चीकरण होते ते कसे बंद करायचे याबद्दल शिफारसच नाही! 'प्राथमिक शिक्षण' हा शब्द मसुद्यात दोनतीनदा येतो; पण त्याचा स्वतंत्र विचार करण्यात आलेला नाही. शालेय शिक्षणाबद्दल (म्हणजे मुख्यत: माध्यमिक शिक्षणाबद्दल) १४

शिफारशी आहेत. पण उच्च माध्यमिक शिक्षणाबद्दल फक्त चार ओळींत दोन शिफारशी आहेत. याचा अर्थ असा घ्यायचा का की उच्च माध्यमिक शिक्षणाच्या पातळीवर सर्व काही आलबेल आहे?

खरे पाहता मराठी भाषेविषयीच्या धोरणाचा विचार इतर भाषांचा विचार केल्याशिवाय होऊच शकत नाही. शिक्षणात मराठीबरोबरच संस्कृत, इंग्रजी, जर्मन, फ्रेंच इ० परकीय भाषा आणि कन्नड, गुजराती, उर्दू, अशा अन्य भारतीय भाषा यांचाही समावेश असतो. शिवाय आदिवासी भाषांचा विचार व्हायला हवा. त्यांपैकी शिक्षणाच्या कुठल्या टप्प्यांवर कोणत्या भाषांचा समावेश असावा याबद्दलचे एकात्मिक धोरण तयार केल्याशिवाय मराठीचा विचार पुरा होऊच शकत नाही. पण भाषा सल्लागार समितीतील विद्वानांना हे उमगलेले नाही. डॉ० अशोक केळकरांसारखा एखादा भाषावैज्ञानिक समितीत असता तर असा हा झापडबंद विचार झाला नसता.

उच्च शिक्षणासंबंधी नऊ शिफारशी आहेत. त्यातील क्र० ३ व क्र० ९ या दोन शिफारशी अत्यंत महत्त्वाच्या आहेत. क्र० ३ची शिफारस म्हणते 'महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांत 'मराठी भाषाभ्यास व भाषाविज्ञान' असा स्वतंत्र विभाग निर्माण करण्यात यावा.'' हे करणे म्हटले तर अवघड नाही. सध्याचे भाषाविज्ञान विभाग आहेत, त्यांचेच परिवर्तन ''भाषाविज्ञान व मराठी भाषेचा अभ्यास'' या विभागांत करता येईल. त्याचबरोबर मराठीच्या एम०ए०च्या अभ्यासक्रमात 'मराठीचे भाषाविज्ञान' ह्या विषयाची निदान एक प्रश्नपत्रिका आवश्यक करणे' या धोरणाचीही शिफारस हवी होती.

उच्च, शिक्षणासंबंधीची क्र० ९ची शिफारस 'मराठी भाषेचे विद्यापीठ' याबद्दलची आहे. त्यासंबंधी 'भाषा आणि जीवन'ने पाच वर्षांपूर्वी संपादकीय लिहिले आहे. (हिवाळा २००९)

मराठीच्या शिक्षणामध्ये अन्य भाषकांसाठी (म्हणजे अ-मराठी भाषकांसाठी) मराठीचे अध्यापन या अत्यंत महत्त्वाच्या विषयाकडे फारसे लक्ष दिले गेलेले नाही. वास्तविक पाहता सध्याच्या जागतिकीकरणाच्या झपाट्यात लाखो अन्यभाषक महाराष्ट्रात आलेले आहेत, येत आहेत. त्यांपैकी काही अल्पकाल तर काही दीर्घकाल महाराष्ट्रात राहतात. उद्योग, पर्यटन, व्यवसाय, अध्ययन-अध्यापन, व्यापार, मनोरंजन, संशोधन अशा अनेक क्षेत्रांत अन्यभाषक आले आहेत. त्यांना त्यांच्या गरजेनुसार मराठी शिकवण्याची कोणतीही यंत्रणा आज अस्तित्वात नाही. ए०सी०एम० (असोशिएटिड कॉलेजिज् ऑफ मिडवेस्ट) किंवा अमेरिकन सेंटर ऑफ इंडियन स्टडीज यासारख्या संस्था आपल्या विद्यार्थ्यांपुरती त्याची सोय करतात. पण आधुनिक तंत्रे व कौशल्ये यांचा उपयोग करून विविध पातळ्यांतून विकसित होत जाणारे मराठीचे अध्यापन, त्यासाठी संशोधन, शिक्षकांचे प्रशिक्षण, पाठ्यपुस्तके हे सर्व करण्याचे शासनाचे धोरण असायला हवे. असा एक प्रकल्प मुंबई





अनुक्रमणिका

विद्यापीठाच्या जर्मन विभागाने सुरू केला आहे. त्याची दखल घेणे व त्याला आर्थिक व अन्य प्रकारचा पाठिंबा देणे या धोरणात समाविष्ट व्हायला हवे. या प्रकल्पामध्ये शासकीय सेवेतील अ-मराठी सेवकांना मराठी शिकता येईल, मराठीच्या त्यांच्या कौशल्याच्या विविध पातळ्यांवरील प्रमाणित परीक्षा घेता येतील. (बऱ्याच मराठी भाषकांनासुद्धा अशा परीक्षांची सक्ती केली जावी, अशी आज मराठी भाषकांच्या मराठीची अवस्था आहे!)

या मसुद्यातील महत्त्वाच्या शिफारशी बिनमहत्त्वाच्या, अव्यवहार्य आणि शब्दबंबाळ शिफारशींच्या ढिगाऱ्यात गाडल्या गेल्या आहेत. त्यापैकी निदान मराठीसाठी स्वतंत्र विद्यापीठ स्थापन करण्याचे धोरण शासन स्वीकारील अशी आशा आहे. अशा विद्यापीठाची स्थापना झाली तर इतर अनेक आवश्यक गोष्टी ते विद्यापीठ करू शकेल. अशा विद्यापीठाची आवश्यकता मांडणारे संपादकीय, 'भाषा आणि जीवन'ने हिवाळा २००९ (वर्ष २७, अंक १) या अंकात लिहिले याचे स्मरण सहजच होते. महाराष्ट्राची भाषिक पाहणी करणे (अशी पाहणी ब्रिटिश शासनाने १८९८ ते १९२०च्या दरम्यान, १९०५मध्ये केली होती), मराठी शब्दांची वारंवारता शोधून काढणे, शब्दकोश इ० इतर आवश्यक प्रकल्प ते विद्यापीठ सुरू करू शकेल.

■

---

**मुखपृष्ठाविषयी :**

या अंकावर भालचंद्र नेमाडे यांच्या 'कोसला' (१९६३) या कादंबरीतील शेवटचा परिच्छेद त्यांच्याच हस्ताक्षरात दिला आहे. (मुखपृष्ठाची योजना त्यांना भारतीय ज्ञानपीठ पारितोषिक जाहीर होण्यापूर्वी केली होती.)

नेमाड्यांच्या भाषाशैलीची आणि पांडुरंग सांगवीकरच्या मनोवृत्तीची काही वैशिष्ट्ये या परिच्छेदात व्यक्त झालेली आहेत, असे वाचकांना आढळून येईल आणि नेमाड्यांच्या पुढील वाटचालीचे स्पष्टीकरणही कदाचित मिळू शकेल.

---





अनुक्रमणिका

तीन अनुवाद

# १. आँकडों की बिमारी

- कुँवर नारायण

एक बार मुझे आँकडों की उल्टियाँ होने लगी
गिनते गिनते जब संख्या
करोडों को पार करने लगी
मैं बेहोश हो गया

होश आया तो मैं अस्पताल में था
खून चढाया जा रहा था
ऑक्सीजन दी जा रही थी
कि मैं चिल्लाया
डॉक्टर मुझे बुरी तरह हँसी आ रही
यह हँसानेवाली गैस है शायद
प्राण बचानेवाली नहीं
तुम मुझे हँसने पर मजबूर नहीं कर सकते
इस देश में हर एक को अफसोस के साथ जीने का
पैदाइशी हक है वरना
कोई माने नहीं रखते हमारी आजादी और प्रजातंत्र

बोलिए नहीं - नर्स ने कहा - बेहद कमजोर हैं आप
बडी मुश्किल से काबू में आया है रक्तचाप

डाक्टर ने समझाया- आँकडों का वाइरस
बुरी तरह फैल रहा आजकल
सीधे दिमाग पर असर करता
भाग्यवान हैं आप कि बच गए
कुछ भी हो सकता था आपको-

सन्निपात कि आप बोलते ही चले जाते
या पक्षाघात कि हमेशा के लिए बन्द हो जाता
आपका बोलना
मस्तिष्क की कोई भी नस फट सकती थी
इतनी बडी संख्या के दबाव से
हम सब एक नाजुक दौर से गुजर रहे
तादाद के मामले में उत्तेजना घातक हो सकती है
आँकडों पर कोई दवा काम नहीं करती
शान्ति से काम लें
अगर बच गए आप तो करोडों में एक होंगे...

अचानक मुझे लगा
खतरों से सावधान कराते किसी संकेत-चिन्ह में
बदल गई थी डाक्टर की सूरत
और मैं आँकडों का काटा
चीखता चला जा रहा था
कि हम आँकडे नही आदमी है

■

तीन अनुवाद

## १. आकड्यांचा आजार

अनुवाद : **कैलास सार्वेकर**

एकदा मला आकड्यांच्या उलट्या व्हायला लागल्या
मोजता मोजता जेव्हा संख्या
करोडोच्या वर जाऊ लागली
तेव्हा मी बेशुद्ध झालो

शुद्धीवर आलो तेव्हा मी दवाखान्यात होतो
रक्त चढवले जात होते
ऑक्सिजन दिला जात होता
मी ओरडलो, डॉक्टर मला तुफान हसू येत आहे
हा हर्षवायू आहे कदाचित,
प्राणवायू नाही
तुम्ही मला हसायला भाग पाडू शकत नाही
या देशात प्रत्येकाला दु:खासोबत जगण्याचा
जन्मसिद्ध हक्क आहे, नाहीतर
काही अर्थ नाही आपल्या स्वातंत्र्य आणि प्रजासत्ताकाला

बोलू नका - नर्स म्हणाली, खूप अशक्त आहात तुम्ही
मोठ्या प्रयत्नांनी अवाक्यात आला आहे रक्तदाब

डॉक्टरांनी समजावलं : आकड्यांचा विषाणू
फार पसरत चाललाय आजकाल.
सरळ डोक्यावर परिणाम करतो.
भाग्यवान आहात तुम्ही म्हणून वाचलात,
नाहीतर काहीही होऊ शकलं असतं तुम्हाला.
शक्तिपात, ज्याने बोलता बोलताच गेला असता;
किंवा पक्षाघात, ज्याने कायमची बंद झाली असती तुमची वाचा;





अनुक्रमणिका

डोक्यातील कोणतीही नस फुटू शकली असती
एवढ्या मोठ्या संख्येच्या दबावाने.
आपण सगळे एका नाजूक स्थितीतून जात आहोत;
आकड्यांच्या लोंढ्यामध्ये क्षोभ घातक ठरू शकतो.
आकड्यांवर कोणतेही औषध काम करत नाही
धीरानं घ्या
जर वाचलात तर तुम्ही व्हाल करोडोतील एकमेव...

अचानक मला वाटलं
धोक्यापासून सावध करणाऱ्या कुठल्यातरी संकेत-चिन्हात
बदलून गेलाय डॉक्टरांचा चेहरा;
आणि मी, आकड्यांचा काटा,
ओरडत चाललोय,
की आम्ही आकडे नाही; माणसं आहोत माणसं!

■

# २. अंक और अक्षर / आकडे आणि अक्षरे

कुँवर नारायण
अनुवाद : कैलास सार्वेकर

हवा मे उड रहे थे अंक ही अंक
चिडियों की तरह चहचहाते
कभी मकानों पर बैठ जाते
कभी दुकानों पर
कभी मोटरों पर
कभी बिजली के तारों पर ।

सब पकड रहे थे उन्हे
अपनी अपनी तरह
अपनी अपनी जमीन पर ।

किसी के हाथ लगा... १
किसी के हाथ...२
किसी के हाथ...३

जिसके जो हाथ लगा
वह उसी से बैठाने लगा
अपनी जिन्दगी का जोड तोड ।

जिनके हाथ आया...०
उनमें से कुछ
चले गए अंकों से अक्षरों की दुनिया में ।

■

हवेत उडत होते आकडेच आकडे
चिमण्यांसारखे चिवचिवत
कधी बसत घरांवर,
कधी दुकानांवर,
कधी मोटारींवर,
तर कधी विजेच्या तारांवर.

सर्व जण पकडू पहात होते त्यांना
आपापल्या तऱ्हेने
आपापल्या जागी.

कोणाच्या हाती लागला...१,
कोणाच्या हाती ...२,
कोणाच्या हाती ...३.

ज्याच्या हाती जो आला
त्याने तो बसवू लागला
आपल्या जीवनाचे गणित.

ज्यांच्या हाती आले...०,
त्यांच्यातील काही
निघून गेले आकड्यांकडून अक्षरांच्या दुनियेत!

■





अनुक्रमणिका

# ३. शब्दों की तरफ से / शब्दांच्या बाजूने

- कुँवर नारायण

अनुवाद : कैलास सार्वेकर

कभी कभी शब्दों की तरफ से भी
दुनिया को देखता हूँ ।

किसी भी शब्द को
एक आतशी शीशे की तरह
जब भी घुमाता हूँ आदमी,
चीजों या सितारों की ओर
मुझे उसके पीछे
एक अर्थ दिखाई देता
जो उस शब्द से कही बडा होता है

ऐसे तमाम अर्थों को जब
आपस में इस तरह जोडना चाहता हूँ
कि उनके योग से जो भाषा बने
उसमें द्विविधाओं और द्वाभाओं के
सन्देहात्मक क्षितिज न हो, तब-

सरल और स्पष्ट
(कुटिल और क्लिष्ट की विभाषाओं में
टूट कर)
अकसर इतनी द्रुतगति से अपने
रास्तों को बदलते
कि वहाँ विभाजित स्वार्थों के जाल
बिछे दिखते
जहाँ अर्थपूर्ण सन्धियों को होना चाहिए ।

■

कधी कधी शब्दांच्या अंगाने
जगाला पाहतो मी

कोणत्याही शब्दाला
जेव्हा मी फिरवतो
माणसे, वस्तू किंवा ताऱ्यांकडे
एखाद्या अंतर्गोल भिंगाप्रमाणे
तेव्हा त्याच्यामागे
मला जो अर्थ दिसतो तो
त्या शब्दापेक्षा किती तरी मोठा असतो.

अशा सगळ्या अर्थांना मी
आपापसात असे जोडू पाहतो
की त्यांच्यामधून अशी भाषा बनेल
जिच्यात द्विधावस्था आणि द्विभावात्मतांच्या
संशयाचे क्षितिज नसेल, तेव्हा -

सरळ आणि स्पष्ट
(कुटिल आणि क्लिष्टतेच्या विभाषांमधे
तुटून)
ती नेहमी इतक्या वेगाने आपले
रस्ते बदलते
की जेथे अर्थपूर्ण एकसंधता असायला
हव्यात
तेथे तुटक स्वार्थांचे जाळे पसरलेले दिसते.

■

# कोंकणीतील नामवाक्य

- माधवी सरदेसाय
- अनुवाद : विद्या प्रभुदेसाई

'हांव गोंयकार', 'तूं हुशार', 'रामाणी बरो दोतोर', 'हो आंबो, सामको गोड' अशा प्रकारची वाक्ये कोंकणी बोलणाऱ्यांच्या नित्य परिचयाची आहेत. कोंकणीची बहीण असलेली हिंदी ही सुद्धा भारतीय-आर्यकुळातीलच भाषा; परंतु हिंदीत वरील वाक्य 'मैं गोवावासी हूँ' असे वापरले जाते. कोंकणीची मावसबहीण असलेल्या इंग्रजी भाषेत 'आय ॲम् अ गोअन.' असे म्हणतात. मराठी ही कोंकणीची सर्वात जवळची भगिनीभाषा. मराठीत अशा वाक्याची रचना 'मी गोवेकर' आणि 'मी गोवेकर आहे' अशा दोनही प्रकारे करता येते. कोंकणीत मात्र 'हांव गोंयकार असा' असे म्हटल्यास ते औपचारिक वाटते. अशा वाक्याची रचना मराठी रचनातंत्राच्या प्रभावातून झाल्यासारखी वाटते. कोंकणी आणि मराठी भाषांमधील या रचनांची तुलना केल्यास कोंकणीत 'हांव गोंयकार'- सारखी वाक्यरचना अधिक प्रमाणात तर मराठीत 'मी गोवेकर आहे'सारखी वाक्यरचना अधिक प्रमाणात आढळते.

'हांव गोंयकार', 'तू हुशार,' 'रामणी बारो दोतोर', 'हा आंबो सामको गोड' ही नामवाक्ये असून अशा वाक्यांतील उद्देश्य(विषय) आणि त्यांचे विधेय(विधान) या दोघांचा समावेश नाम वर्गातच होतो.

आंत्वान मेय्ये (१८६६-१९३६) या भाषावैज्ञानिकाने सर्वप्रथम अभ्यासकांचे लक्ष नामवाक्याकडे वेधले असे मानतात. मेय्येनंतर पुढे अनेक भाषावैज्ञानिकांनी प्राचीन भारत-युरोपी (इंडो-युरोपियन) भाषांमधील नामवाक्यांचा अभ्यास केला. नंतर एमील बँव्हेनिस्त(१९५०) या भाषावैज्ञानिकाने अभ्यासकांना नामवाक्याकडे पाहण्याची नवी दृष्टी दिली, तसेच या अभ्यासाला खोली प्राप्त करून दिली. त्यांच्याच 'दि नॉमिनल सेन्टेन्स्' (मूळ फ्रेंचमधून अनुवादित, १९६६) या शोधनिबंधाच्या आधारे कोंकणी भाषेतील नामवाक्याचा अभ्यास करण्याचा प्रयत्न या निबंधात केला आहे. (या निबंधातील सर्व उदाहरणे माझ्या कोंकणीतील आहेत.)

बँव्हेनिस्त सांगतात, केवळ भारतीय-युरोपीयन (इण्डो-युरोपीयन) भाषाकुळातच नव्हे; तर जगातील बहुतेक सर्वच भाषाकुळांतील भाषांमध्ये नामवाक्याची रचना होते. आणि म्हणूनच कोणकोणत्या भाषांमध्ये नामवाक्याची रचना होते याची यादी करण्यापेक्षा कोणकोणत्या भाषांमध्ये अशी रचना होत नाही. (आजच्या पश्चिम-युरोपियन भाषांसहित)





अनुक्रमणिका

याची यादी करणे अधिक सोपे; कारण नामवाक्याची व्याप्ती अशी फार मोठी आहे. 'क्रियापदाशिवायची' रचना अथवा ''अस' या धातूचे रूप नसलेले' वाक्य असे म्हणताना भाषेत अशा प्रकारची वाक्यरचना का, कोणत्या पार्श्वभूमीवर, आणि कसला परिणाम दर्शविण्यासाठी केली जाते याचा अभ्यास होण्याची गरज असल्याचे ते मानतात. त्यांनी आपल्या निबंधातही हेच शोधण्याचा प्रयत्न केला आहे.

'अस' धातूची रूपे सामान्यतः उद्देश्य(विषय) आणि विधेय(विधान) जोडण्याचे काम करतात. (भाषाविज्ञानात असे काम करणाऱ्यांना कॉप्युला (Copula) असे म्हणतात. हा मूळ लॅटीन भाषेतील शब्द असून त्याचा अर्थ 'दुवा' (link) असा आहे. बँव्हेनिस्त यांच्या मते 'अस' धातूचे रूप असलेल्या वाक्याला नामवाक्य म्हणता येणार नाही. काही भाषांमध्ये अशाप्रकारचे वाक्य आणि नामवाक्य यांच्यामध्ये भेद करता येत नाही; परंतु सर्व भाषांमध्ये असे होत नाही. 'अस' धातूचे रूप असलेल्या वाक्याला त्यांतील क्रियापद कितीही फोल असले तरीही क्रियापद असलेले वाक्य मानावे लागते. क्रियापद असलेल्या इतर भाषांमधील वाक्यांप्रमाणेच ते असते. त्याला नामवाक्य म्हणता येत नाही; '' 'शुद्ध नामवाक्य' आणि 'अस' धातूचे रूप असलेले वाक्य'' असे नामवाक्याचे दोन वर्ग करणे योग्य नसल्याचे ते सांगतात (१३२, १३५).

भाषेतील अर्थ व्यक्त करण्याची एक विशेष मांडणी म्हणजे नामवाक्य होय. ती समजून घेण्यासाठी, वाक्यातील क्रियापदाचे कार्य समजून घेणे आवश्यक असते. क्रियापद हे वाक्यातील विधेयाला (विधान) काळ-वेळ, प्रसंग, बोलणाऱ्याचे संदर्भ यांना मर्यादा घालते (१३४). नामवाक्यातील विधेयाला या मर्यादांचे बंधन नसते. नामवाक्यातील विधेय हे सीमांच्या बाहेरचे -'असीम' असते. म्हणूनच अशा वाक्याला क्रियापद नसलेले वाक्य म्हणणे योग्य नाही. ते वाक्य क्रियापद असलेल्या वाक्याप्रमाणे 'पूर्ण' वाक्यच असले, तरीही ते वेगळे असते असे बँव्हेनिस्त सांगतात. (१३७).

**कोंकणीतील नामवाक्ये...**

वाक्यात आलेले विधेय सामान्य आहे की विशेष यावरून कोंकणीतील नामवाक्यांची दोन वर्गात विभागणी करता येते : (१) सामान्य नामवाक्ये (२) विशेष नामवाक्ये.

सामान्य नामवाक्यांमध्ये म्हणी, वाक्प्रचार अथवा तत्सम वेळा-काळाचे संदर्भांचे आणि कर्त्यांच्या कर्तेपणाच्या मर्यादेपलीकडील 'अमर्याद-सत्ये' असतात. तसेच, कोणत्याही विशेष उद्देश्यासंबंधी केलेली अशी वाक्ये सामान्य विधाने असतात.

विशेष नामवाक्यांत विशेष उद्देश्यासंबंधी केलेली विशेष विधाने येतात.

नामवाक्यातील उद्देश्य वाक्यातील कोणत्या विधानाकडे संबंध जोडतो त्यानुसार नामवाक्यांचे दोन वर्ग करता येतात.

( १ ) निज-गुणसंबंधी नामवाक्य ( २ ) आंतर उद्देश्यसंबंधी नामवाक्य.

पहिल्या वर्गातील नामवाक्याचे विधेय उद्देश्यांतर्गतच असून त्याच्यापासून अलग करू न शकणाऱ्या एका घटक-गुणासंबंधी असते, तर दुसऱ्या वर्गातील नामवाक्याचे विधेय त्याच्या उद्देश्याचा दुसऱ्या विधेयाच्या उद्देश्याशी असलेला संबंध दाखविणारे असते.

उदा० **(१) सामान्य नामवाक्ये**

(क) निज-गुणसंबंधी

(क १) सवाय खाण पोटफुगें (स्वस्त-कमी किमतीच्या खाण्यामुळे पोट फुगते) (ही म्हण असून पोट फुगविणे हा स्वस्त खाण्याचा गुण होय.)

(क २) कावळो काळो, बगळो धवो. (कावळा काळा, बगळा पांढरा) (दोन साधी वाक्ये जोडून निर्माण केलेले हे जोडवाक्य आहे. कावळा आणि बगळा हे यातील दोन घटक वाक्यांचे उद्देश्य आहेत. काळा आणि पांढरा ही त्यांच्याविषयी केलेली विधाने असून यातील काळा(रंग) हा कावळ्याच्या निज-गुण, तर पांढरा (रंग) हा बगळ्याचा निज-गुण होय.

(क ३) भुरगेपणूच बरें. (बालपणच चांगले.) (चांगलें) (असणे) हा बालपणाचा गुण)

(क ४) मनीस सामको सुवार्थी. (माणूस एकदम स्वार्थी)

(क ५) जीण भोव मोलादीक. (जीवन फार मूल्यवान)

(ख) आंतर-उद्देश्यसंबंधी

(ख १) कसतल्याक पेज, मेरे वयल्याक शीत. (म्हण. जोड वाक्य.) (कष्ट करणाऱ्याला क्षुल्लक मोबदला आणि काठावर उभे राहून देखरेख करणाऱ्याला मात्र चांगला मोबदला.)

(ख २) रेड्या-पाड्यांची झगडीं, झाडाचेर काळ. (फालतू प्राण्यांच्या भांडणामुळे निष्पाप झाडांना त्रास भोगावा लागतो.) (म्हण. जोड वाक्य.) या नामवाक्यातील प्रत्येक घटक-वाक्यांत एक-एक विधान उद्देश्य नसलेले आहे. पहिल्या घटक-वाक्यातील उद्देश्य हे कारणरूप म्हणजे कृतीच्या अगोदरचे असून दुसऱ्या घटक-वाक्यातील उद्देश्य हे कृतीच्या नंतर येणारे परिणामरूप आहे. म्हणजेच ही वाक्ये कारण आणि परिणाम अशा दोन उद्देश्यांशी संबंध जोडणारी नामवाक्ये आहेत.

(ख ३) हाड वैरें, पोट सोयरें. (म्हण. जोड वाक्य.) (हाडे वैरी असतात म्हणून त्यांना कामाला लावले जाते तर पोट नातेवाईक असल्याने त्याला खाद्य दिले जाते.)

(ख ४) हाची सदांचा पिरंगण. (याची नेहमीच कूरकूर असते.) (या नामवाक्यात उद्देश्य 'पिरंगण' हे असून 'सदांचा' हे विधेय आहे.)

(ख ५) ती सगल्या कामांनी मुखार. (ती सर्व बाबतीत पुढे)





अनुक्रमणिका

### (२) विशेष नामवाक्ये

(क) निज-गुणसंबंधी : उद्देश्य आणि विधेय यांचे समीकरण असावे अशी या प्रकारच्या नामवाक्यांची रचना असते.

(क १) म्हापशें गोंयचे शार. (म्हापसा गोव्याचे शहर)

(क २) तिची व्हडली धूव दोतोर. (तिची मोठी मुलगी डॉक्टर)

(क ३) हांव साश्टीकार. (मी साष्टीकर)

(क ४) हो तिचो घोव (हा तिचा नवरा))

(क ५) तूं चड शाणें. (तू फार शहाणी)

(ख) आंतर-उद्देश्यसंबंधी

(ख १) म्हजें घर गोंयां. (माझे घर गोव्याला)

(ख २) कोलवें मडगांवच्यान लागीं. (कोलवा मडगांवपासून जवळ.)

(ख ३) नागपूर गोंयच्यान पयस. (नागपूर गोव्यापासून दूर.)

(ख ४) तूं म्हूण आमी. (तुझ्यामुळे आम्ही)

(ख ५) हांव ताका भावा बशेन. (मी त्याला/तिला भावासारखा.)

नामवाक्यांना क्रियापद जोडायचे असल्यास बहुतेक ठिकाणी 'आस' (अस)धातूचे रूप जोडता येते. कोंकणीत 'आस'(अस) धातूची दोन रूपे आहेत. ती म्हणजे 'आसा' आणि 'आसता'. मराठीतही 'आहे' आणि 'असते' अशी रूपे दिसतात. इंग्रजीमध्ये एकच 'to be', फ्रेंचमध्ये एकच 'ser' हे क्रियापद सापडते, तर पोर्तुगीजमध्ये 'ser' आणि 'estar' ही दोन क्रियापदे सापडतात. स्पॅनीश भाषेतही ही दोन क्रियापदे आहेत. 'आसता' आणि 'आसा' या रूपांनी दिसणारा भेद पोर्तुगीज, स्पॅनीश, या भाषांमध्येही दोन वेगवेगळ्या क्रियापदांनी व्यक्त होतो. बॅव्हेनिस्त 'ser'चा अर्थ 'to be essentially' आणि 'estar'चा अर्थ 'to be existentially or circumstantially' असा करतो. (१४४.)

सामान्य नामवाक्यात क्रियापद जोडायचे असल्यास बहुतेक ठिकाणी 'आस'(अस) धातूच्या 'आसता'(असते) या रूपाने भागवता येते.

( १ ) सवाय खाण पोटफुगें आसता. (स्वस्त खाणे पोट बिघडवणारे असते.)

( २ ) कावळो काळो आसता, बगळो धवो आसता किंवा कावळो काळो आनी बगळो धवो आसता. (कावळा काळा आणि बगळा पांढरा असतो.)

( ३ ) भुरगेपणूच बरें आसता. (बालपणच चांगले असते.)

( ४ ) मनीस सामको सुवार्थी आसता. (माणूस एकदम स्वार्थी असतो.)

( ५ ) जीव भोव मोलादीक आसता. (जीवन फार मूल्यवान असते.)





अनुक्रमणिका

आंतर-उद्देश्यसंबंधी सामान्य नामवाक्यातील पहिल्या दोन उदाहरणांमध्ये (ख १ आणि ख २) 'आसता' क्रियापद नेमके 'बसत' नाही. ''कसतल्याक पेज मेळटा, आनी मेरे वयल्याक शीत मेळटा.'' ''रेड्या-पाड्यांची झगडीं जातात आनी झाडाचेर काळ येता.'' असे म्हणणे अधिक योग्य वाटते. (याचा अर्थ, कोंकणीतील सर्वच नामवाक्यांत अनुपस्थित क्रियापदांच्या जागा आस(अस) या धातूच्या क्रियापदाने भरून काढता येत नाहीत.) इतर वाक्यांमध्ये मात्र 'आसता' हे रूप वापरता येते.

( ६ ) हाड वैरें आसता, पोट सोयरें आसता. (हाड वैरी असते, पोट नातलग असते.)
( ७ ) हाची सदाच पिरंगण आसता. (याची नेहमीच कुरकूर असते.)
( ८ ) ती सगल्या कामांनी मुखार आसता. (ती सर्व बाबतीत पुढे असते.)

विशेष नामवाक्यांमध्ये क्रियापदाची योजना करताना 'आस'(अस) धातूचे 'आसा' हे रूप वापरता येते. परंतु या प्रकारच्या निज-गुणसंबंधी वर्गातील, प्रामुख्याने वरील उदाहरणांतील वाक्यांप्रमाणे असलेल्या वाक्यांना, जर 'आसा' हे क्रियापद जोडले तर ते फारच अप्रशस्त वाटेल. अर्थात ही रचना एकदम चुकीची नसली तरी 'कोंकणीची निज-भाषिक रचना' वाटणार नाही. मराठी मातृभाषक जेव्हा नव्यानेच कोंकणी बोलतो तेव्हा 'म्हापशें गोंयचे शार आसा', 'तिची व्हडली धूव दोतोर आसा', 'हावं साष्टीकार आसां', 'हो तिचो घोव आसा' अशाप्रकारे 'आसा'चा वापर करून वाक्ये तयार करतो.

विशेष नामवाक्याच्या निज-गुणसंबंधी वर्गातील काही नामवाक्ये 'आस'(अस) क्रियापद घालून तयार करता येतात. परंतु अशा प्रकारची रचना कोंकणीत फारच विरळ आढळते.

विशेष नामवाक्यांच्या आंतर-उद्देश्यसंबंधी वर्गातील वाक्यांची रचना करताना 'आसा' या क्रियापदाचा वापर होऊ शकतो.

( १ ) म्हजे घर गोंया आसा. (माझे घर गोव्याला आहे.)
( २ ) कोलवे मडगांवच्यान लागी आसा. (कोलवा मडगावपासून जवळ आहे.)
( ३ ) नागपूर गोंयच्यान पैस आसा. (नागपूर गोव्यापासून दूर आहे.)
( ४ ) तूं आसा म्हूण आमी आसा. (तू आहेस म्हणून आम्ही आहोत.)
( ५ ) हांव ताका भावा बशेन आसां. (मी त्याला/तिला भावाप्रमाणे आहे.)

यातील पहिली चार वाक्ये कोंकणी कानाला नक्कीच अपरिचित वाटणार नाहीत. परंतु 'हांव ताका भावा बशेन आसां' या रचनेपेक्षा 'हांव ताका भावा बशेन' ही वाक्यरचना अधिक योग्य वाटते.

नामवाक्यातील विधेय आणि 'आस'(अस) धातूचे रूप घालून बनविलेले विधेय या दोहोंत फरक असल्याचे या दोनही विधेयांची सूक्ष्म तुलना केल्यास लक्षात येते.

आस (अस) क्रियापदाबरोबर वाक्याला काळाच्या, प्रसंगाच्या आणि कर्तेपणाच्या मर्यादा पडतात. उदाहरणार्थ, ''सवाय खाण पोट फुगें.'' अशा वाक्यातून सर्वांचे, सार्वकालिक आणि म्हणून अमर्याद असलेले विधान जेव्हा ''सवाय खाण पोट फुगें आसता,'' या प्रकारे समोर येते तेव्हा त्याला बोलणाऱ्याच्या अनुभवविश्वाची चौकट पडते. एखाद्या विशिष्ट व्यक्तीने तिच्या अनुभवाच्या आधारे एखाद्या विशिष्ट प्रसंगी केलेले ते मर्यादित विधान होते. त्याचप्रमाणे ''मडगांवच्यान कोलवें लागी'' (मडगावजवळ कोलवा) हे सत्य दुसऱ्या कोणत्याही गोष्टीवर अवलंबून नाही; परंतु जेव्हा ''मडगांवच्यान कोलवें लागीं आसा'' असा प्रयोग होतो तेव्हा तो एका व्यक्तीचा अनुभव असतो. ''मनीस सुवार्थी'' या वाक्यात 'सुवार्थी' हे विशेषण माणसाच्या अस्तित्वातच सामावलेले असते; ते त्याच्यापासून वेगळे काढता येत नाही. परंतु जेव्हा ''मनीस सुवार्थी आसता'' अशी रचना केली तेव्हा बोलणाऱ्याच्या निरीक्षणातून त्याने काढलेला निष्कर्ष तो व्यक्त करतो.

निज-गुणसंबंधी विशेष नामवाक्यांमध्ये काही विशेषणे विधेय(विधान) म्हणून येतात. तेव्हा आस(अस) धातूच्या दोनही रूपांसहित वाक्यरचना करता येते.ही वाक्ये पहा :

(क १) हांव दुयेंत. (मी आजारी)
(क २) हांव दुयेंत आसा. (मी आजारी आहे.)
(क ३) हांव दुयेत आसतां (मी आजारी असतो.)
(ख १) हीं शेतां पाचवीं. (ही शेतें हिरवी)
(ख २) हीं शेतां पाचवीं आसात. (ही शेतें हिरवी आहेत.)
(ख ३) हीं शेतां पाचवीं आसतात. (ही शेतें हिरवी असतात.)
(ग १) तो भुरगो बरो. (तो मुलगा बरा)
(ग २) तो भुरगो बरो आसा. (तो मुलगा बरा आहे.)
(ग ३) तो भुरगो बरो आसता. (तो मुलगा बरा असतो.)

क्र० क १, ख १ आणि ग १ या नामवाक्यांमधील विशेषणात्मक विधाने कर्त्याच्या अस्तित्वापासून वेगळी काढता येत नाहीत. 'आसा' वापरून केलेल्या वाक्यरचनेत ती बोलणाऱ्याने विशिष्ट काळाच्या संदर्भात केलेली, विषयाच्या तत्कालीक अवस्थेविषयीची केलेली विधाने असतात. तर 'आसात' वापरून केलेली वाक्यरचना म्हणजे बोलणाऱ्याच्या अनुभवातून आलेली कर्त्याच्या एका स्थिर अवस्थेविषयीची विधाने होत.

नामवाक्यातील विशेषणात्मक विधान हे क्रियापद लावून तयार केलेल्या वाक्यातील क्रियाविशेषण बनते. उदाहरणार्थ, ''तो भुरगो बरो'' या वाक्यातील 'बरो' हे गुणविशेषण (गुड) (good) मुलाच्या स्वभावाचा एक घटक-गुण आहे. ''तो भुरगो बरो आसा/आसता'' या वाक्यात 'बरो' (वेल) (well) हे क्रियाविशेषण 'मुला'च्या असण्याच्या स्थितीविषयी म्हणजेच 'मुलगा कशा प्रकारचा आहे' याविषयी माहिती देते.





अनुक्रमणिका

जेव्हा नामवाक्यातील विशेषणात्मक विधान न बदलणाऱ्या अशा स्थिर गुणविशेषणांनी बनलेले असते तेव्हा त्याची 'आसा'/ 'आसता' अशी रूपे लावून क्रियापदासहित वाक्यरचना करता येत नसावी असे वाटते. (या संदर्भात अभ्यास होण्याची गरज आहे.) उदाहरणार्थ, 'तो दुष्ट' या वाक्याची 'तो दुष्ट आसा' अशी रचना कोंकणीत होत नाही. अशी रचना केल्यास ती उपरी वाटते. 'तो दुष्ट आसता' अशी रचना तर अत्यंत अपवादात्मकच होते. 'तो अर्दकुटो'(तो अर्धवट), 'तो फटींग'(तो खोटारडा) 'तो सामको देवमनीस'(तो अगदी देवमाणूस) अशा स्वरूपाच्या रचनांमध्येही वरीलप्रमाणेच 'आसा'/ 'आसता' अशी रूपे लावून क्रियापदासहित वाक्ये बनवता येत नाहीत.

कोंकणीत क्रियापद असलेल्या वाक्यांची नकारात्मक रूपे 'नास' धातूच्या रूपातून घडतात. उदाहरणार्थ -

( १ ) तो खाता : तो खायना. (तो खातो : तो खात नाही.)

( २ ) तो खातालो : तो खायनाशिल्लो. (तो खात होता : तो खात नव्हता.)

( ३ ) तो खातलो : तो खावचो ना. (तो खाईल : तो खाणार नाही.) याचप्रमाणे,

( ४ ) तो बरा आसा : तो बरो ना. (तो बरा आहे : तो बरा नाही.)

( ५ ) कावळो काळो आसता : कोवळो काळो नासता, किंवा कावळो काळो आसना.
(कावळा काळा असतो, किंवा कावळा काळा असत नाही.)

नामवाक्यात क्रियापद नसल्याने त्याचे नकारार्थी रूप करताना 'नास' धातूच्या रूपाचा आधार घेता येत नाही. कोंकणीत नकार दर्शविण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या 'न्हय' (नाही) या शब्दाचाच वापर करून नकारार्थी रूप करता येते.

( १ ) तो बरो : तो बरो न्हय. (तो बरा : तो बरा नाही)

( २ ) कावळो काळो : कावळो काळो न्हय. (कावळा काळा : कावळा काळा नाही.)

**नामवाक्य : कोंकणी भाषेचा एक विशेष.**

एके काळी गोव्यातील काही ख्रिस्ती बांधवांनी लिहिलेल्या कोंकणीत 'म्हापशें वर्तता गोंयचे शार.'(म्हापसा आहे गोव्याचे शहर.), 'तिची व्हडली धूव वर्तता दोतोर'(तिची मोठी मुलगी आहे डॉक्टर.) अशा प्रकारची वाक्यरचना केली जात असे. पोर्तुगीज भाषेच्या प्रभावातून अशी रचना केली जात असावी असे म्हणण्यास जागा आहे.

आजच्या कोंकणी लेखनात 'वर्तता' दिसत नाही. परंतु त्याची जागा 'जावन आसा' या प्रयोगाने घेतल्याचे दिसते. कोंकणी विद्यार्थ्यांच्या लिखाणात आणि औपचारिक बोलण्यात असे प्रयोग आढळतात. गंमत म्हणजे अनौपचारिक बोलण्यात कोणत्याच 'गोंयकारा'च्या तोंडी 'जावन आसा' असे शब्द येत नाहीत. आलेच तर ते औपचारिक बोलण्यात अथवा लिखाणात येतात; केवळ ख्रिश्चनांच्याच नव्हे, तर हिंदूंच्याही बोलण्यात आणि लिखाणात येतात. आणि हे प्रयोग दोन प्रकारे केले जातात. एक युरोपीय पद्धतीने





अनुक्रमणिका

आणि दुसरा देशी वाक्यरचनेच्या पद्धतीने - उदाहरणार्थ, युरोपीय पद्धतीने - ('म्हापशें जावन आसा गोंयचे शार.') तसेच देशी वाक्यरचनेच्या पद्धतीनुसार ('म्हापशें गोंयशें शार जावन आसा.') हिंदू वाक्यरचनेत 'जावन आसा' या शब्दाचा प्रयोग वाक्याच्या शेवटी होतो.

'जावन आसा' कोंकणीच्या उत्क्रांतीतील एक तात्पुरता टप्पा (पासिंग फेज) (passing phase) असू शकतो. वाक्याला क्रियापद असलेच पाहिजे; हिंदी, मराठी, इंग्लिश या भाषांमध्ये ते असतेच असे वाटल्यामुळे कोंकणीतील ही कमतरता भरून काढण्यासाठी आम्ही कोंकणीत 'जावन आसा'ची स्थापना केली असावी.

नामवाक्य ही कोंकणीची स्वाभाविक रचना. सोळाव्या शतकातील युरोपीय धर्मोपदेशक जेव्हा कोंकणी शिकले तेव्हा अशी नामवाक्याची रचना ते शिकले होते. त्यांच्या मातृभाषेत कॉप्युला(copula) आवश्यक म्हणून कोंकणीतही तें असले पाहिजे असे त्यांनी ठरवले असे नसून हा कोंकणीचा स्वभावगुण ओळखून त्यांनी कोंकणी रचना केली असावी. उदाहरणार्थ, 'दौत्रीना क्रिश्तां'ची सुरुवात पाहता येते :

गुरु : तूं क्रिस्त्सुं?

शिसु : होय(,) परमेस्वराचे क्रुपेन.

गुरु : क्रिस्ताउं म्हणजे कितें?

शणै गोयबाबांच्या ललित लेखनातही नामवाक्याचा सुंदर वापर केलेला दिसतो. ''बाबुमामालो पणस'' (गोमंतोपनिषत, पैले खंड १९३३) या निबंधात आरंभीच्या परिच्छेदातील ३२ वाक्यांपैकी १८ नामवाक्ये आहेत : ''...तसलो पणस हो न्हय, सगळ्या भतग्रामांत हाची नामना... अब्बा! कसलो तर पणस हो!... सगळ्या गोंयां पैलवैलें दाबण तें हाका... सकैलें मूळ धरून वैले तेंगशेमेरेन, खांद्या-खांद्यानी अश्शे कुचकुचीत पणस... पणस पुण केंदो, इल्लोसो, माणकुलोच... मोटायेन व्हडल्याइश्या नाल्ल्यायेदें जायत. धोंग-पोंग निखालुस ना. वाटकुळी गुड्डी कशेंशें. वानयेन बरें. भितर सगळे घरेच घरे. नाजूक बरें. चांफी कशेशे... घरो जाल्यार हळ्ळुवो सतम्याचें भांगर. म्होंवान थपथपीत... भिकण तरी केंदें? इल्लेंशें कुकूलें. मावूय माणकुली मूठ कशी.''

नामवाक्याचा, कोंकणीतील या भाषिक स्वभाववैशिष्ट्याचा, अभ्यास झाला पाहिजे. त्या दिशेने केलेला हा एक लहानसा प्रयत्न आहे. परिपूर्ण आहे असे नाही. ■

(मूळ लेख 'कोंकणीतले नामवाक्य : एक टिपण', 'जाग' वर्ष ३९ : अंक ९ : मे, २०१३.)

**संदर्भ :** Benveniste Emile. 'The Nominal Sentence (1950) 'Problems in General Linguistics [ tr. of French (1966) by Mary Elizabeth Meek. ] Miami: University Press. 1977. 131-144.

# इंग्रजीच्या विस्तृत प्रभावाच्या कारणांवरून मिळणारे धडे

सुधाकर मराठे
अनुवाद : प्रदीप गोपाळ देशपांडे

[इंग्रजी भाषेचा जसा संपूर्ण विस्ताराने प्रभाव पडला, तसा मराठीचा प्रभाव कधी पडेल का? या प्रश्नावर निबंध लिहिण्यास मला सांगण्यात आले होते. तो हा निबंध.]

इंग्रजी भाषेच्या इतिहासाशी संबंधित काही कळीची वैशिष्ट्यं आपल्याला मराठी भाषेच्या इतिहासात आधीच आढळून येतात. उदाहरणार्थ, भारतात इंग्रजांची वसाहत होण्यापूर्वीच मराठी समाज आणि भाषा यांचा राजकीय व सामाजिक विस्तार झालेला होता. मराठी राजसत्ता व भाषा यांचा लक्षणीय विस्तार जवळपास संपूर्ण भारतीय उपखंडावर झालेला होता. तरीही इंग्रजी भाषेच्या तुलनेत मराठी भाषेनं खास स्वतःला म्हणता येईल असा मागे ठेवलेला वारसा फारशा गांभीर्यानं घेता यावा इतका महत्त्वाचा नव्हता. तद्वतच, ब्रिटिश लोक भारतात येण्यापूर्वीच कितीतरी शतकं मराठी वाङ्मय विलक्षण बहरलेलं होतं - अगदी चॉसरनं इंग्रजीत लिहिण्यासाठी लेखणी हातात घेण्यापूर्वीच! तरीही, तुलनेसाठी क्षेत्र निर्माण करण्याइतका प्रभाव मराठी भाषा अन्य भाषांमधील वाङ्मयावर पाडू शकली नाही हे उघड आहे. आणि एकेकाळी इंग्रजीनं जसे जगभर हातपाय परसले, किंवा आजही ती खूप मोठी मोठी क्षेत्रं आपल्या भाषिक उपयुक्ततेच्या माध्यमातून काबीज करत आहे हे वास्तव बघता - निदान नजीकच्या भविष्यकाळात तरी मराठी भाषेला अशा विस्ताराची संधी आहे असे दिसत नाही.

मग अशी तुलना करण्यानं आपल्याला काय साध्य होणार आहे? तर या दिशेनं आपण ह्या विषयाकडे वळलो तर काही महत्त्वाचे धडे आपल्याला घेता येतील असे मला वाटते. आणि यापैकी काहींचा मागोवा घेण्याचा प्रयत्न मी करणार आहे.

सर्वप्रथम तुलना. युरोपातील प्रबोधन काळ आणि शेक्स्पियरच्या काळातील अर्वाचीन इंग्रजीचा स्फोट येथून प्रारंभ केला तर असे आढळून येईल की इंग्रजी भाषा व वाङ्मय यांनी अन्य भाषा व वाङ्मय यांचे महत्त्वाचे प्रभाव सातत्यानं व स्वागतशीलतेनं स्वीकारले आणि त्याच वेळी अन्य भाषा व वाङ्मय यांच्यावरही स्वतःचा प्रभाव पाडला. ह्या प्रक्रियेत इंग्रजी भाषेत अपरिहार्यपणे अनेक अर्थपूर्ण बदल घडून आले, आणि परिणामतः ती

पूर्वीपेक्षाही अधिक सामर्थ्यवान झाली. मराठी भाषेच्या इतिहासात अशा समांतर घटना तितक्या प्रमाणात घडून आल्याचे आढळत नाही.

जवळपास त्याच सुमारास इंग्रजीत बौद्धिक व वैज्ञानिक क्षेत्रांत प्रचंड उलाढाली सजगपणे झालेल्या दिसून येतात. याच क्षेत्रांत समांतर प्रगत होत असलेले युरोपातील इतर देश, तसेच ॲटलांटिक महासागराच्या पलीकडील प्रदेश व त्यांच्या भाषांकडून देखील इंग्रजी स्वत:ला अधिक समृद्ध करून घेताना दिसते. तत्कालीन परिस्थितीची निकड भागवण्याच्या प्रयत्नांमुळे देखील इंग्रजीने प्रगतीच्या दिशेने दमदार वाटचाल केलेली दिसून येते. असंही काही मराठीत घडलेले आढळत नाही.

सतराव्या शतकाच्या मध्यापासून संपूर्ण युरोपात तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात झपाट्याने विकास होऊ लागला होता. त्यातही ह्या क्षेत्रात इंग्लंड विशेष यशस्वी झालेले होते. अर्थात, अशा प्रकारच्या उपक्रमांमधील सक्रियता हे इंग्लंडच्या राष्ट्रीय प्रकृतीचे एक अंग होते की काय हा स्वतंत्र चिंतनाचा विषय असू शकतो. तथापि. तंत्रज्ञान आणि वैज्ञानिक क्षेत्रातील संपर्क व्यवहाराची निकड म्हणून इंग्रजी भाषा विकसित होणे, ती अधिक लवचीक, अधिक नेमकी, अधिक साधी होणे अटळ होते. मराठी भाषेच्या इतिहासात अशा प्रकारचे काही घडल्याचे आढळत नाही.

याच काळात 'रॉयल् सोसायटी'सारख्या अनेक संस्था जन्माला आल्या आणि त्यांनी ज्याची विश्वसनीयता शंकास्पद वाटते अशा फसव्या संशोधनापासून खरे मौलिक कार्य कोणते हे ओळखून वेगळे करण्याच्या प्रयत्नांना प्राधान्य दिले. तसेच इंग्रजी भाषेच्या उन्नतीलाही उत्तेजन दिले. शास्त्रज्ञांमधील स्पर्धांना गांभीर्य प्राप्त झाले. ह्यात हौशी, व्यावसायिक, पूर्णवेळ व अर्धवेळ कामगार, मध्यमवर्गीय तसेच उच्चभ्रूंचाही समावेश होता. हे लोक संशोधनात्मक निरीक्षणे करीत, त्यांचा अभ्यास करीत आणि आपल्या कार्याची अन्य संशोधकांशी देवाणघेवाणही करीत. त्यांच्या अभ्यासाच्या आस्था-विषयांचा परीघ इतिहास व भूगर्भशास्त्र अशा विषयांपासून ते निसर्गाच्या पर्यावरणातील पशु-पक्षी, कालवे, महामार्ग तसेच शहरांतील मलनि:सारण व्यवस्था इतक्या विविध क्षेत्रांना सामावून घेणारा होता. नंतर नजिकच्याच काळात संपर्क-व्यवहार हा बऱ्याचदा भाषेच्या नियमांच्या कडक सोवळ्याचा फारसा धाक न बाळगता सामान्य लोकांना समजेल व आवडेल अशा भाषेच्या व तिच्या विविध रूपांच्या वाटांनी होणार होता. मराठी भाषेच्या इतिहासात अशा समांतर घडामोडीही आढळून येत नाहीत.

एव्हाना ऑक्स्फर्ड आणि केंब्रिज अस्तित्वात येऊन शेकडो वर्षे लोटली होती. ह्या विद्यापीठांनी केवळ भाषा व्यवहाराच्या विकास व प्रसारालाच हातभार लावला असे नव्हे, तर त्यांच्या योगदानामुळे व इंग्रजी समाजातील इतर काही घटकांमुळे तत्त्वज्ञान सुलभ करणारी इंग्रजी भाषाही उदयास आली. याची साक्ष जॉन लॉक, लॉर्ड बार्कले आणि

ह्यूम यांचे कार्य देते. विज्ञानविषयक जनजागृती आणि सारासार विवेक यांपासून जगातील काही भाग जसे फटकून राहिले तशी ह्या क्षेत्रांशी फारकत या चळवळीने घेतली नाही. उदाहरणार्थ, सूफी संप्रदाय किंवा तुकाराम यांची शिकवण केवळ दैनंदिन जगण्याशी निगडित तत्त्वज्ञान सांगणारी होती. ती काही बुद्धिवादी व्यवस्थेशी डोळस जवळीक असणारी नव्हती. मराठी भाषेच्या इतिहासात ह्यालाही समांतर उदाहरण नाही.

अठराव्या शतकाच्या प्रारंभी इंग्लंड ही जगातली सर्व शक्तिमान नाविक सत्ता झालेली होती. आणि तिच्या नौकांचा संचार जगातील सर्व समुद्रांवर होत होता. इंग्रजांनी संपूर्ण जगातून संपत्ती आणि ज्ञान मिळवले होते आणि ह्या दोन्हींच्या संचयासाठी आवश्यक असणारे पूरक बदल इंग्रजी भाषेने आत्मसात केले होते. इंग्लंडच्या ह्या विस्तारवादामागे केवळ भौतिक व आर्थिक महत्त्वाकांक्षेची निष्ठूर प्रेरणा आहे असा आरोप वसाहतवादाच्या कडवट विरोधापोटी आपण करतो. परंतु, सत्यापासून यापेक्षा दूर काहीही असू शकत नाही. कारण या काळात अस्तित्वात असलेल्या बौद्धिक वातावरणामुळे ज्ञानाच्या क्षेत्रात स्वतःच्या प्रगतीसाठी प्रत्येक प्रत्ययामागील वस्तुस्थिती व वास्तव जाणून घेण्याचे जे प्रचंड कुतूहल इंग्लंडमध्ये होते त्याला तोड नाही. उदाहरणार्थ, राष्ट्रा-राष्ट्रांमध्ये झालेली ज्ञान-विज्ञानाच्या क्षेत्रातली प्रचंड देवाणघेवाण इंग्लंडच्या पुढाकारानेच झाली हे कदाचित सर्वज्ञात नाही. ज्ञानाच्या शोधप्रक्रियेत वनस्पतिशास्त्र व पक्षीविषयक शास्त्र अशा क्षेत्रांतील संशोधनात्मक निरीक्षणे, मीमांसा, शंका, प्रश्न, सिद्धान्त व अभ्यास यांचीही मुक्त देवाणघेवाण या राष्ट्रांमध्ये आपापसांत झाली. मराठीच्या इतिहासात असे काही घडल्याचे उदाहरण आढळत नाही.

त्याच सुमारास जगाच्या विविध भागांत आधुनिक तंत्रज्ञान उदयाला आले. ह्यातही सर्वांत अर्थपूर्ण प्रगती इंग्लंडनेच केलेली होती. पुढील तीनपैकी कोणत्याही एका वस्तुस्थितीचा विचार केला तरी हे सिद्ध होऊ शकेल : (१) एका महाशक्तीचा किताब बहाल करू शकणाऱ्या तंत्रज्ञानाचा विकास करण्याची क्षमता; (२) ब्रिटिश भारताचा तंत्रज्ञान युगात प्रवेश; (३) एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील तंत्रज्ञानविषयक दैनंदिन अभिलेख. तसे पाहिले तर मध्ययुगाच्या उत्तरार्धात लाँग बो व क्रॉस बो या तंत्रज्ञानाच्या साह्याने इंग्लंडने फ्रान्सवर अनेक विजय मिळवले होते. आणि केवळ सैनिकी बळावर मिळवलेल्या विजयांच्या कितीतरी पलीकडील अर्थ व संदर्भ या विजयांना होते. कल्पना, गृहितके, प्रक्रिया, पद्धती, निष्कर्ष यांपासून ते कारागीर, कामगार, निर्मितीतले भागीदार व स्पर्धक या सर्वांमध्ये झालेल्या प्रयोगांच्या आणि विचारांच्या देवघेवीमुळे इंग्रजी भाषा अधिकाधिक बहरत गेली. मराठी भाषेच्या इतिहासात असे उदाहरण नाही.

त्याच काळाने इंग्लंडमधील आधुनिक सांसदीय लोकशाही शासनाचा प्रारंभिक अवस्थेतील विकास पाहिला. आणि अशी सांसदीय लोकशाही ही तिला पूरक असणाऱ्या

भाषेच्या विकासाशिवाय सशक्त होत नसते हे वेगळे सांगण्याची गरज नाही. यापूर्वीच, म्हणजे शेक्स्पियरच्या काळापासूनच, भित्तिपत्रके, ग्रामपत्रके इ० ही माहिती, ध्येयवाद आणि वाङ्मय यांच्या व्यापक संपर्क व प्रसाराची साधने झालेली होती. ही प्रक्रिया राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांतही उपयुक्त ठरली. याची परिणती इंग्रजी भाषेच्या अभूतपूर्व भरभराटीत झाली. मराठी भाषेच्या इतिहासात यालाही समांतर असं उदाहरण आढळत नाही.

भित्तिपत्रक आणि विविध स्वरूपात निघणारी अन्य पत्रके यांच्या मागोमाग अठराव्या शतकात वृत्तपत्रे व लेख यांचा साक्षर वाचक वर्गही पूर्वी कधीही नव्हता इतक्या मोठ्या प्रमाणात वाढला. परिणामत: विविध विषयांवरील पुस्तकांच्या विक्रीत प्रचंड वाढ झाली. यांत वैद्यकशास्त्र, इतर शास्त्रे व विज्ञानविषयक लेखन यांच्याबरोबरच औपरोधिक लेख, तसेच अगदी काव्याचा प्रचार करणारे लेख यांचाही समावेश होता. (उदाहरणार्थ, डफोचे 'शॉर्टेस्ट वे विथ द डिसेंटर्स'; पोपचे एसेज् ऑन मॅन अँड क्रिटिसिझम आणि वर्डस्वर्थचे 'टु द लिरिकल बॅलडस्' सतत वाढत जाणाऱ्या साक्षर व शिक्षित समाजामुळे भाषेचे प्रमाणीकरण करण्याकडे कल वाढला हे शेक्स्पियरच्या नाटकांच्या निघालेल्या विविध आवृत्त्या आणि सॅम्युअल जॉन्सनच्या विलक्षण शब्दकोशावरून दिसून येते. अशा प्रकारचे काही घडलेलेही मराठी भाषेच्या इतिहासात आढळत नाही.

अठराव्या व एकोणिसाव्या शतकात ब्रिटिश साम्राज्याच्या वसाहतीकरणाचा वेग आणि अफाट विस्तार यांची इंग्रजी भाषेच्या विकास व प्रभावाला अर्थातच मदत झाली. ह्या मुद्द्याचा विस्तारानं ऊहापोह करण्याची आवश्यकता नाही. पण मराठी भाषेच्या इतिहासात अशाही प्रकारचे काही घडल्याचे आढळत नाही.

मग पुढे ब्रिटिशांच्या (ज्यात आयरिश, स्कॉटिश आणि वेल्श लोकही अंतर्भूत आहेत) आशियातील व आफ्रिकेतील वसाहतींच्या मोहिमांव्यतिरिक्त योगायोगाने स्थापन झालेल्या प्रारंभिक अवस्थेमधील 'ब्रिटिश कौन्सिल'चीही मदत इंग्रजी भाषेच्या विकासासाठी झाली. गमतीने असे म्हणायला हरकत नाही की अमेरिका, ऑस्ट्रेलिया आणि न्यूझिलंड या देशांमधील इंग्रजांच्या वसाहती इंग्रजी भाषेच्या प्रभावाचे अनेक स्रोत जगभर असल्याची ग्वाही देतात! मराठी भाषेच्या इतिहासात, यासाठी समांतर उदाहरण नाही.

अठराव्या शतकात भरभराट झालेल्या इंग्रजी भाषेची ब्रिटिश समाजमानसात व्यापक आणि खोलवर रुजण्याची जी प्रवृत्ती होती तिला त्याच शतकातील आणि नंतर एकोणिसाव्या शतकातील वाढत्या प्रमाणात प्रसिद्ध होऊ लागलेल्या दैनिक नियतकालिकांचा मोठा हातभार लाभला. उत्कृष्ट गुणवत्तेचे एकाहून एक सरस दैनिक अभिलेख प्रकाशित होऊ लागले. अफाट विषयवैविध्य त्यांत होते. विलक्षण प्रभावी अशी वस्तुनिष्ठ माहिती सचित्र स्वरूपात त्यांतून प्रकाशित होत गेली. सुरुवातीला एखाद्या कुटुंबातील एखाद्याच

माणसाला वाचता येत असे, तरीही वाचकवर्ग सातत्यानं वाढतच गेला. शिक्षणाचा प्रसार औद्योगिक क्षेत्रातील कामगार आणि कामगारांच्या संस्थांमध्येही होऊ लागला. महिलांमध्येही शिक्षणाचा प्रसार झपाट्याने होत गेला. शाळा आणि महाविद्यालयांमधून तज्ज्ञांची व्याख्याने होऊ लागली. (उदा० जॉन रस्किनची 'विज्ञान आणि कला' या विषयावरची व्याख्याने.) महाराष्ट्रीय इतिहासाच्या तुलनेत कितीतरी आधीपासून सामान्य इंग्रज माणूस वाढत्या प्रमाणात इंग्रजी भाषेच्या सतत विस्तारत जाणाऱ्या जीवनात सामील केला गेला. इंग्लंडमध्ये कुप्रसिद्ध वर्गविग्रहाला न जुमानता ही प्रक्रिया सातत्यानं चालूच राहिली. (इथे जात आणि वर्ग ह्या दोहोंतील मूलभूत फरक आपण लक्षात घ्यायला हवा.) मराठी भाषेच्या इतिहासात असे उदाहरण आपल्याला सापडत नाही.

इंग्लंडमध्ये या प्रक्रियेला प्राचीन व अर्वाचीन अशा दोन्हीही संस्थांचे योगदान लाभले. उदाहरणार्थ, अत्यंत उच्च दर्जाचे शिक्षण घेतलेले पुरोहित जसे इंग्लंडमध्ये होते; तसेच महाराष्ट्रातही होते. पण या दोहोंमध्ये एक लक्षणीय फरक होता. ख्रिस्ती पुरोहित शेक्स्पियरच्याही अगोदर सहस्र वर्षांपासून उपदेशाचं कार्य अव्याहतपणे करीत आहेत. मराठी पुरोहितांनी तसे केलेले नाही. ब्रिटिश चर्चमध्ये धर्मोपदेशाची साप्ताहिक व्याख्याने आणि उपदेश ऐकण्यासाठी समाजातील सर्व वर्गांचे लोक नियमित उपस्थित असत. भाषेच्या समृद्धीसाठी आवश्यक असणारे हे स्रोत इंग्लंडमध्ये उपलब्ध असण्यातले सातत्य मराठी भाषेच्या इतिहासात आढळत नाही.

इंग्लंडमध्ये आधुनिक साहित्य आणि पत्रकारिता हे एकमेकांबरोबरच विकसित होत गेले. विल्मय कॉबेट् बोचच्या टीकेची ग्रामपत्रकं व निबंध असोत की चार्लस् किंग्जले व चार्लस् डिकन्स् यांचे लिखाण असो; या सर्वांच्या लिखाणाने सामाजिक समस्यांना वाचा फोडली. एवढेच नव्हे, तर त्या देशातील कायद्यांमध्येही बदल घडवून आणले. तद्वतच, अनेक भूखंडांवर पसरलेल्या ब्रिटिश वसाहतींमधील प्रजेला इंग्रजी भाषा शिकवण्याच्या गरजेची परिणती आशिया व आफ्रिकेत इंग्रजी शिक्षण सुरू होण्यात झाली. ह्यामुळे इंग्रजी भाषेचा विकास आणि तिच्या प्रभावक्षेत्राचा विस्तार या दोहोंनाही प्रोत्साहन व गती मिळाली. मराठीमध्ये ह्याला समांतर म्हणता येईल असे कधीच घडले नाही.

खरेतर इंग्रजी भाषेच्या विकासाची अशी कितीतरी कारणे सांगता येतील. तथापि, भाषिक विकासाच्या ह्या काळातच कितीतरी आपत्तींचा चिवटपणे सामना करत करत इंग्रजी भाषा बहरत गेली. आतापर्यंत चर्चा केलेल्या प्रत्येक कारणांमधून मिळणारा बोध तसा स्पष्टच आहे. इंग्रजी व मराठी या भाषांमध्ये अर्थपूर्ण असे साम्य फार थोडे आहे. त्याऐवजी 'मराठी भाषा खरीखुरी कशी बहरेल, स्वत:च्याच घरात तिला दिले गेलेले दुय्यम स्थान व तिच्या नशिबी आलेली सावत्र बहिणीची वागणूक कशी झुगारता येईल' अशा प्रश्नांचा विचार आपण करणे हे अधिक अगत्याचे होईल. आपल्या विषयाला अभिप्रेत

असलेली तुलना वर्तमान संदर्भात तरी केवळ निरुपयोगीच नाही, तर मारकदेखील आहे. तेव्हा, मराठी आणि इंग्रजी ह्या भाषांना बळेच एकमेकींशेजारी बसवून त्यांची निरर्थक तुलना करण्यापेक्षा काही बाबींचे स्पष्टीकरण करणे हे अधिक आवश्यक आहे.

सर्वप्रथम हे सांगणे आवश्यक आहे की खुद्द आपल्याच नको इतक्या असंख्य देशबांधवांनी एक मूर्खपणाची व घातक चूक केलेली आहे. अशा अनावश्यक तुलनेमुळं आपल्यामध्ये एक न्यूनतेची भावना अकारण निर्माण झालेली आहे. आणि हीच मूर्खपणाची व घातक चूक आपल्या देशातील केवळ जास्तीत जास्त प्रांतांमध्ये बोलल्या जाणाऱ्या व केवळ ह्या निकषावर 'मोठ्या' व 'महत्त्वाच्या' ठरलेल्या भाषांच्या भाषकसमूहांनी देखील केली आहे. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे इंग्रजीच्या तुलनेत मराठीला कमी लेखण्यामागच्या आजपर्यंतच्या कोणत्याही भूमिकेचे समर्थन करता येत नाही, आणि भविष्यातही ते कधीही करता येणार नाही. इथे टेनिसन्च्या 'युलिसिस्'चे उदाहरण त्यात थोडासा फेरबदल करून देण्याचे स्वातंत्र्य घेणे अनुचित होणार नाही - इंग्रजी भाषा तिच्या ठिकाणी तिचे काम करत आहे, आणि मराठी आपल्या ठिकाणी आपले स्वत:चे काम करत आहे.

मी मांडतो आहे ती कल्पना इतकी साधी आहे की तिच्या साधेपणाने आपण गोंधळून जाऊ शकतो; तरीही आपल्याच देशात ह्या न्यूनगंडाने जवळजवळ गेली दोन शतके आपल्या मानसिकतेवर वर्चस्व गाजवले आहे. ह्या वस्तुस्थितीशी संपूर्ण विरोधाभास असणाऱ्या, थोड्याशा अलीकडील भूतकाळातील एका घटनेकडे मी तुमचे लक्ष वेधू इच्छितो. ती म्हणजे आपल्याला स्तिमित करणारी 'भाषा आणि जीवन' हे नियतकालिक. ह्या नियतकालिकाची निर्मिती डॉ० अशोक केळकर यांनी केलेली आहे. आणि, आपली मराठी भाषा व तिने आपल्याकडे सोपवलेला वैभवी वारसा यांच्याबद्दल रास्त गर्व, आत्मविश्वास व समाधान बाळगण्याची आपली निकड अधोरेखित करणारी त्यांनी बनवलेली त्यांचीच 'स्टिकर्स्'!

अशा भाषिक व सांस्कृतिक प्रश्नांचे मूल्यमापन करण्यासाठी आपल्याच गोंधळलेल्या बौद्धिकतेतून आपणच निर्माण केलेल्या निकषांमुळे आपल्या समाजाची अतोनात हानी झालेली आहे. एकीकडे संभ्रमावस्थेतून निर्माण झालेल्या या निकषांमुळे जीवनातल्या प्रत्येक क्षेत्रात व दैनंदिन जगण्यात इंग्रजीला अवास्तव महत्त्व देणारी विकृत संकल्पना (अशा बेगडी विद्वत्तेचे ढोंग इंग्लंडनेही क्वचितच अनुभवले असेल!); आणि दुसरीकडे ह्यामुळे अशा अस्वीकारार्ह व गैरलागू निकषांमुळे आपणच आपल्याच भाषेचे केलेले अवमूल्यन! आणि तेवढ्याच विकृत तऱ्हेने इंग्रजी भाषेचे अध्यापन आणि शिक्षण या दोन्हींचाही दर्जा गेली पाच दशके एका खोल गर्तेत कोसळलेला आहे. इंग्रजीची भरभराट आणि प्रभाव यांच्यामागील मी वर नमूद केलेली काही कारणे तुम्हाला आठवायला कदाचित् हरकत नसावी. आपण हे समजून घ्यायला हवे की यापैकी कोणतीही कारणे व परिस्थिती मराठी

भाषेच्या संदर्भात कधीही निर्माण झालेली नव्हती. आणि म्हणूनच या दोन्ही भाषांची तुलना व्हावी अशी 'भाषेची भरभराट' किंवा तुलना करता येण्याजोगी 'प्रभाव क्षेत्रे' असले निव्वळ असंबद्ध निकष लावून आपण मराठीवर अन्याय करीत आहोत. आणि हेच निकष मराठी भाषेची 'साध्ये' म्हणून यापुढेही चालू ठेवणे हे तर केवळ हास्यास्पद आहे. अत्यंत साधी बाब म्हणजे मराठी ही इंग्रजी नाही आणि कधीही नव्हती. ह्या संदर्भात काही वेगळ्याच बाबींचा विचार करणं आपल्यासाठी उपयुक्त होईल.

इंग्रजी भाषेने कमावलेली आजची प्रतिष्ठा, महत्त्व व उपयुक्तता ही काही कोणत्याही पूर्वनियोजित योजनेची परिणती नव्हे हे आपण लक्षात घेणे आवश्यक आहे. आणि आपणही अशीच एखादी योजना आखणे हा आपल्यासाठीही एका भ्रामक वैभवाच्या मृगजळाचा पाठलाग ठरू शकेल. आपल्या चिंतेची जाण आपल्या आधीच आपल्याकडील काही द्रष्ट्या विद्वानांना आलेली होती. जवळपास शंभर वर्षांपूर्वी रानड्यांना 'ट्वेंटिएथ सेंच्युरी' इंग्रजी-मराठी शब्दकोश' निर्माण करण्याची आवश्यकता का वाटली? आणि ह्या आवश्यकतेची खंबीर पाठराखण करणारा एक अग्रलेख लोकमान्य टिळकांनी 'केसरी'मध्ये का लिहिला? (रानड्यांच्या ह्या शब्दकोशाच्या नंतरच्या आवृत्तीत ह्याच अग्रलेखाचा चक्क 'प्रस्तावना' म्हणून समावेश केला गेला.) अपरिपक्व राजनीती आणि खोट्या शौर्याची फुशारकी यांची आपण आजपर्यंत करत आलो तशी सरमिसळही आपल्यासाठी हितावह नाही. मराठी ही एक महत्त्वाची भाषा आहे हे एक निर्विवाद सत्य आहे. जगातील बहुसंख्य इतर भाषांपेक्षा मराठी बोलणाऱ्यांची संख्या कित्येक लाखांनी अधिक आहे. लक्षावधी लोकांच्या जगण्याच्या परिघातील विविध गरजा अन्य कोणत्याही भाषेइतक्याच परिणामकारकतेने मराठी भाषाही भागवते. आणि आता तर विविध कारणांनी जगभर विखुरलेल्या मराठी वक्ते, लेखक आणि वाचकांचा एक नवसमाजच उदयाला आला आहे हेही काही कमी नाही.

मराठीला स्वतःची अशी एक महान परंपरा आहे आणि ती अन्य कोणत्याही भाषेच्या परंपरेपुढे निस्तेज होऊ शकणार नाही. तसेच तिच्यात कोणत्याही अंगभूत उणिवा नाहीत. ती काही अगदी अश्मयुगीन भाषा नव्हे. तिने फार मोठ्या प्रमाणात आधुनिकता व तंत्रज्ञान, भौतिकशास्त्रे व समाजशास्त्रे अशा ज्ञान-विज्ञान शाखा आत्मसात केलेल्या आहेत. तिच्यात अधिक शुद्धता व कसब आलेले आहे. तिने स्वतःचा विस्तारही घडवून आणला आहे. इतर भाषिक संस्कृतींमधील जे चांगले आहे तेही निःसंकोचपणे उचलले आहे. जगातील कित्येक भाषांपेक्षा मराठी ही बाह्य जगाला अधिक सामोरी गेली आहे. तिची बलस्थाने ही आहेत आणि इंग्रजी व मराठी ह्या दोन्ही भाषा एकमेकींपासून अकारण फटकून राहण्याच्या समस्येचा सामना करण्यासाठी ह्या बलस्थानांचा वापर करणे आवश्यक आहे. इंग्रजीशी मराठीची अन्याय्य तुलना करून आपल्याला भाषेचे स्वातंत्र्यही साध्य





अनुक्रमणिका

करता येणार नाही किंवा भाषेची आत्मनिर्भरताही प्राप्त करता येणार नाही.

शिवाय, मराठी काय करू शकेल किंवा तिने काय करायला हवे याची अपेक्षा करताना आपण सारासार बुद्धीने तर्कशुद्ध आणि व्यवहार्य दृष्टिकोन बाळगणे आवश्यक आहे. तुलनाच करायची झाल्यास आपल्या मराठीसारखीच गोची युरोपातील प्रमुख भाषांसह जगातल्या अनेक भाषांचीही झालेली दिसेल. तंत्रज्ञान आणि इतर अनेक क्षेत्रांतील अफाट वेगाने झालेली प्रगती व बदल यांनी ह्या बेसावध जगाला घेरल्याने ज्या तऱ्हेने हे जग अवाक् झाले त्याला ॲल्विन टॉफ्लर ताज्या इतिहासाचा 'फ्यूचर शॉक' असे म्हणतो. आणि ह्या 'फ्युचर शॉक'च्या धक्क्यातून साऱ्या भाषा अजून पुरेशा बाहेर येऊ शकलेल्या नाहीत. कदाचित् 'मराठी व इंग्रजी यांची तुलना' ह्या एकाच गोष्टीवर खर्च होत असलेली आपली शक्ती एका वेगळ्या दिशेने वळवावी लागेल आणि पुढील काळात 'इंग्रजीशिवाय काहीही करता येणार नाही,' ह्या वास्तवाचे दूरदर्शीपणाने भान ठेवून समंजसपणे पुढील वाटचाल करावी लागेल. ह्या वस्तुस्थितीचा मराठी अथवा इंग्रजी यांपैकी कोणत्याही भाषेचा 'थोरवी' वा 'चांगलेपणा'शी फारसा संबंध नाही. हा केवळ एक ऐतिहासिक अपवात किंवा योगायोग आहे आणि त्याकडे तसेच पाहिले पाहिजे.

अतिशहरीकरणामुळे मराठीला निर्माण झालेला धोकाही आता टळला आहे असे दिसते. दलित आणि इतर वंचित समाजांनी स्वतःच्या प्रखर आत्माविष्कारासाठी व अभिव्यक्तीसाठी ज्या तऱ्हेने मराठी भाषेचा वापर केला तिच्या मुळाशी असलेल्या विद्रोही अस्मितेला जगात तोड नाही. कारण आजपर्यंत बंदिस्त असलेली मराठी भाषेतील कितीतरी ऐतिहासिक वैविध्ये त्यांच्या ग्रामीण व रांगड्या बोलीभाषांमधून अभिव्यक्त होऊन पुनरुज्जीवित होतील अथवा यानंतर टिकून राहतील. मराठी साहित्य बहरत आहे; परंतु मराठी समीक्षा खऱ्या अर्थाने बहरत नाही असे आजकाल ऐकायला येते. आणि ह्याच कारणामुळे मला आजच्या विषयाकडे परत वळावे लागते आहे.

मराठीबद्दल न्यूनतेची भावना ही संपूर्णतः बिनबुडाची व टोकाच्या अडाणीपणातून आलेली आहे हे अगदी स्पष्ट आहे. मराठीचा वापर करण्यात आम्हाला अभिमान किंवा समाधान वाटत नसेल तर परमेश्वरच आमचं रक्षण करो. पण आपल्या मनातील दुहेरी भीतिपायी विसरलेल्या वास्तवातील काही गोष्टी आपण ओळखणे अत्यंत आवश्यक आहे. उदाहरणार्थ, आपल्याला इंग्रजी माध्यमाच्या शाळांची गरज नाही. गरज आहे ती मराठी माध्यमाच्या शाळांमध्ये केवळ उत्कृष्टच नव्हे, तर अप्रतिम दर्जाच्या इंग्रजी शिक्षकांची. आपल्या मनातील न्यूनतेची भावना आपण मुलांमध्ये संक्रमित करत नाही याची जोवर आपल्याला खात्री आहे, तोवर मराठीला कोणतीही इजा होऊ शकणार नाही. उलट, मराठीमध्ये काय महत्त्वाचे व आवश्यक आहे यावरच आपण आपसात वितंडवाद घालत बसलो तर आपल्या भाषेला त्यातून कुठलाही लाभ होणार नाही. तिची गत हिंदीसारखी





अनुक्रमणिका

होईल - नव्हे, ती तशी होतच आहे. उदाहरणार्थ, वाईट इंग्रजी आणि इंग्रजीतून होणारे भयानक भाषांतर यांच्या प्रचंड घुसखोरीनं आज शुद्ध हिंदीची जागा पत्रकारिता व दूरदर्शन या क्षेत्रांमध्ये बळकावली आहे.

अगदी गेल्या शतकाच्या प्रारंभापर्यंत विधवांना ज्या उपेक्षेने आपण वागवले अन् घरातल्याच एका दुर्लक्षित कोपऱ्यापुरते त्यांचे अस्तित्व सीमित ठेवले, तशी वागणूक जर आपण मराठीला दिली नाही, तर मराठी भाषा स्वत:ची उत्तम काळजी घेऊ शकेल. इंग्रजीचे स्तोम माजण्यात व ते माजवण्याच्या सांस्कृतिक गुन्ह्यात जोवर आपणच प्रत्यक्ष भागीदारी करत नाही तोवर तरी मराठीला इंग्रजीपासून कुठलाही धोका नाही. ह्याकरता आपल्याला एक शिस्त पाळावी लागेल, काही पथ्ये पाळावी लागतील, काही काळजी घ्यावी लागेल, काही नैतिक बंधने स्वीकारावी लागतील. केवळ आळसापोटी सहजासहजी, विनासायास उपलब्ध होतो म्हणून एखादा इंग्रजी शब्द वापरून वेळ निभावून नेण्याऐवजी स्वभाषेतील योग्य शब्द हुडकण्याचे कष्ट घेण्याची चिकाटी अंगी बाळगावी लागेल. विकृत व ढोंगी भपकेबाजपणाकरता आपणच दोषी असू. डॉ० अशोक केळकरांचे जीवन आणि कार्य ही माझ्या आग्रही प्रतिपादनाला लाभलेली साक्ष आहे. कारण त्यांचे अनेक भाषांवर प्रभुत्व होते आणि त्यातील एकाही भाषेवरील अधिकार त्यांनी अखेरपर्यंत गमावलेला नव्हता.

■

**भाषेचा अंतस्तर**

''...दिवसाकाठी रोजच्या जगण्याचे ऊर्ध्वपातन होऊन त्याची निदान एक ओळ व्हावी, असे स्वप्न तरी काहीही लिहू म्हणणाऱ्याला बाळगता आले पाहिजे. अबोध मनात भाषेच्या अंतस्तराखालीच कवितेच्या ध्वनिस्तरांचाही उगम होत असतो. ह्या स्थितीत आपले संपूर्ण भान भाषेसाठी पणास लावता आले नाही तर कवितेच्या द्रव्याची हवा होऊन जाते, असा माझा दीर्घ अनुभव आहे. कवितेच्या भाषेच्या या अंमली द्रव्याखाली आपले सगळे व्यक्तिमत्त्व अटीतटीने राहू देण्याच्या तुकारामकथित युद्धाचा प्रसंग प्रत्येक लिहिणाराला अत्यंत मोलाचा वाटणे साहजिक आहे, कारण या अंमली भाषेच्या कमी-जास्त स्पर्शावर एकंदर साहित्याच्या भाषेची मदार असते. ह्यामुळेच कविता ही सर्व साहित्य प्रकारांना केंद्रीय असते. दुर्दैवाने भाषेच्या अंतस्तरात गाडून घेऊन जगण्याची प्रत्येक घडी लढवणे दुष्कर होऊन बसते.''

-भालचंद्र नेमाडे , प्रस्तावना, 'देखणी'

# महाराष्ट्र राज्याचे पुढील २५ वर्षांसाठीचे मराठीभाषाविषयक धोरण २०१४

- सुशान्त शं० देवळेकर

महाराष्ट्र शासनाने मराठी-भाषा-सल्लागार-समिती नेमून तिच्याकरवी महाराष्ट्र राज्याच्या पुढील २५ वर्षांसाठीच्या मराठीभाषाविषयक धोरणाचा मसुदा तयार करवून घेतला आणि तो जनतेला उपलब्ध करून देऊन त्यावर जनतेचे अभिप्राय घेण्याचे ठरविले ही गोष्ट निश्चितच अभिनंदनीय आणि स्तुत्य आहे. मराठी भाषेविषयी सध्या जी निराशा चहुकडे दाटलेली दिसते आणि जिचे पडसाद उपरोक्त मसुद्याच्या दुसऱ्या प्रकरणात उमटलेले दिसतात त्या परिस्थितीतही शासन मराठी भाषाविषयक धोरण आखू पाहात असेल तर हे एक चांगले चिन्ह आहे असे मानले पाहिजे. निव्वळ स्वाभिमानवेगळ्या इतर गोष्टींची जोड मिळाल्यावाचून मराठीला तिचे अपेक्षित स्थान लाभणार नाही ह्याची जाणीव शासनाला झालेली आहे ह्याचे हा धोरणाचा मसुदा हे निदर्शक आहे.

मराठी भाषेविषयीच्या सद्य:स्थितीचा आढावा मसुद्यात बऱ्यापैकी विस्ताराने घेण्यात आलेला आहे. त्यात आणखी भर घालता येणे शक्य आहे. विशेषत: त्या सद्य:स्थितीची साधार कारणमीमांसा होणे आवश्यक वाटते. मराठी भाषेच्या सद्य:स्थितीची कारणे समजून घेतली नाहीत तर सद्यस्थितीचे निदान नीट होणार नाही आणि निदान नीट झाले नाही तर त्यावरची उपाययोजना नीट होणार नाही.

मराठी भाषाविषयक धोरणाची उद्दिष्टे मांडताना ''मराठी भाषेचा वापर हा केवळ अस्मितेचा प्रश्न नसून तो मराठी माणसाच्या अस्तित्वाचाही प्रश्न आहे.'' असे वाक्य आले आहे. (पृ० २६). अस्मिता किंवा आत्मखुणा / ओळखी ह्या स्वरूपत:च अशा असतात की आपण त्या कधीही स्वीकारू शकतो आणि कधीही त्यांचा त्याग करू शकतो. विविध कारणांनी माझी 'मराठी' ही ओळख निर्माण झालेली असते आणि मी स्वत: ती ओळख महत्त्वाची मानतो तोवर ती ओळख टिकून राहते. काही वेळा प्रचंड गैरसोयी आणि दडपशाही सहन करूनही माणसे आपली विशिष्ट ओळख सोडायला तयार होत नसतात (उदा० बेळगावातील मराठी भाषक) तर काही वेळा एखादी ओळख गैरसोयीची ठरू लागली की माणसे त्याकडे पाठ फिरवू शकतात (!). मराठी भाषेचा त्याग करूनही 'मराठी' ही ओळख केवळ शब्दाने/ऐतिहासिक वारसा म्हणून टिकवून धरता येते. अशा

परिस्थितीत जर तो ऐतिहासिक वारसा नाकारण्याची वेळ आली नाही तर मराठी भाषेचा वापर न करताही मराठी म्हणून समूहाचे अस्तित्व राहू शकेल. सध्याचा मराठी भाषक समाज ह्या दिशेने वाटचाल करू लागलाच आहे. तेव्हा आपल्याला मराठी भाषेचा वापर होत राहावा असे वाटत असेल आणि त्यासाठी आपण धोरण आखणार असू तर त्याचा इतर गोष्टींशी असलेला संबंध नीट तपासूनच घेतला पाहिजे आणि उपरोक्त विधानांसारखी ढोबळ विधाने धोरण अंतिम करताना शक्यतो ठेवू नयेत.

**मराठीसाठी कार्य करणाऱ्या विविध व्यक्ती आणि संस्था ह्यांच्या कार्याचा आढावा**

मराठी भाषाविषयक धोरण आखताना आजवर मराठी भाषेसाठी काम करत असलेल्या शासकीय संस्था, इतर संस्था, व्यक्ती ह्यांच्या कामाचा सविस्तर आढावा घेणे आवश्यक आहे. धोरणाच्या मसुद्यात उल्लेखलेली कार्ये आधीपासूनच करणाऱ्या व्यक्ती किंवा संस्था असतील तिथे नव्याने यंत्रणा निर्माण करण्यापेक्षा अस्तित्वात असलेल्या यंत्रणांना बळ देणे आवश्यक ठरेल.

**शिक्षणविषयक शिफारशी**

मराठी भाषाविषयक शिफारशींपैकी शिक्षणविषयक शिफारशी महत्त्वाच्या आहेत. ज्ञानदेव आणि तुकाराम मराठी शाळात शिकले नाहीत आणि तरी त्यांनी मराठी समृद्ध केली असे युक्तिवाद अलीकडे ऐकू येऊ लागले आहेत आणि त्यांचा उद्देश शिक्षणाचे माध्यम आणि मराठीचा विकास ह्यांची फारकत करणे हे असते. ज्ञानदेव-तुकारामांच्या काळात सार्वत्रिक शिक्षणपद्धतीच अस्तित्वात नव्हती ह्याकडे मात्र असे युक्तिवाद करणारे सोयीने दुर्लक्ष करतात. धोरणाच्या मसुद्यात तसे दुर्लक्ष केलेले नाही हे उत्तम झाले.

मराठी शाळांचे अस्तित्व टिकवण्यासाठी आणि त्या समृद्ध करण्यासाठी विविध शिफारशी करण्यात आल्या आहेत. प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणातून मराठीचे उच्चाटन गेल्या काही वर्षात झपाट्याने होऊ लागले आहे. पण ह्याची मुळे पुन्हा इतिहासातच आहेत. प्राथमिक शिक्षणात देशी भाषा आणि माध्यमिक शिक्षणापासून इंग्लिश अशी व्यवस्था इंग्रजी राजवटीत असली तरी ती निरपवाद नव्हती. निव्वळ इंग्लिश माध्यमांच्या प्राथमिक शाळा होत्याच. पुढे त्यांना अधिक प्रतिष्ठा लाभली. सामान्यांची मुले देशी भाषांत शिकणार आणि साहेबांची मुले इंग्लिशमधे हे राजवट बदलली तरी तसेच राहिले. शाळांना व्यावसायिक स्वरूप होतेच. ते ठळक झाल्यावर बाजाराचा वारा कोणत्या दिशेने वाहतो हे ओळखून इंग्लिश माध्यमाच्या शाळा निघू लागल्या. बाजाराचा वारा मराठीला अनुकूल नसल्याने मराठी शाळा स्पर्धेत टिकू शकत नाहीत हे वास्तव आहे. पण दशकभरापूर्वी मराठी माध्यम सोडून इंग्लिश शाळेत घालण्यासाठी समर्थने देण्याची आवश्यकता होती. तशी समर्थने आज शेकड्याने उपलब्ध झाली आहेत. माध्यमाची निवड ही शाळाबाह्य परिस्थितीने नियत होत आहे. ती परिस्थिती पालटवल्यावाचून माध्यमाचा प्रश्न सुटणार

नाही. ही परिस्थिती पालटवण्यासाठी केवळ मराठीच्या पातळीवर काम करून भागणार नाही. देशातील विविध भाषांची एकत्रित मोट बांधणे आवश्यक आहे.

### उच्च शिक्षणात मराठीचा अंतर्भाव करण्याविषयी

शालेय माध्यमाचा प्रश्न सोडवण्यासाठी दोन्ही टोकांकडून प्रयत्न सुरू होण्याची आवश्यकता आहे. मराठी नीट येत नसताही पुढे काहीच अडणार नसल्याची निश्चिती असेल तर मराठीतून शिकण्याची आवश्यकता राहणार नाही. त्यामुळे मराठीवाचून अडेल (पण ही मराठीच्या आड केलेली अडवणूक वाटणार नाही) अशी परिस्थिती निर्माण करायला हवी. अशा तऱ्हेचा एक मार्ग न्यायमूर्ती रानडे ह्यांनी सुचवलेला होता. पदवीच्या स्तरावर उत्तीर्ण होण्यासाठी स्वभाषेतून पदवीच्या विषयावर एक निबंध सादर करण्याची अट घालणे व ती पूर्ण केल्यावाचून पदवी न देणे हा तो मार्ग. जर महाराष्ट्रात निर्वाहासाठी मराठी उत्तम अवगत असणे आवश्यक नसेल तर मराठी शाळा कितीही चकचकीत केल्या तरी त्या रिकाम्याच राहतील. अशी स्थिती निर्माण करण्याच्या दृष्टीने पुढील २५ वर्षात काय करता येईल ह्याचे धोरण आखणे आवश्यक आहे.

### उच्च न्यायालयाच्या प्राधिकृत भाषेचा दर्जा

न्यायालयातील मराठीचा वापर हा अतिशय कळीचा मुद्दा आहे आणि करता येतील त्या कृती प्रथम करण्याच्या दृष्टीने तो सोपा आहे. मराठीला उच्च न्यायालयाच्या प्राधिकृत भाषेचा दर्जा देणे ही तातडीची प्राथमिक कृती आहे आणि ती सर्वस्वी शासनकर्त्यांच्या इच्छेवर अवलंबून आहे.

### विधिशिक्षण आणि विधिव्यवहार

त्याचबरोबर मराठीतून विधिशिक्षणाची सोय करणे आणि न्यायालयाच्या कामकाजाची भाषा प्राधान्याने मराठी करणे ह्यासाठी प्रयत्न करत राहावे लागतील. केंद्रीय अधिनियमांचे प्राधिकृत पाठ उपलब्ध होणे, अधिनियमांच्या भाषांतरांसोबत त्यांचे अर्थ सोदाहरण स्पष्ट करणारी भाष्ये उपलब्ध होणे आणि जनसामान्यांना न्यायव्यवहारातील विविध संकल्पना आणि संज्ञा त्यांच्या व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीने समजावून देणाऱ्या साधनांची निर्मिती करणे आवश्यक आहे.

### मराठी सोपी करणे

शासनव्यवहारातील आणि इतर व्यवहारांतील मराठी सोपी करण्याबाबत अनेकदा सूचना करण्यात येतात आणि तशी शिफारस धोरणाच्या मसुद्यातही केलेली आढळते. पण सोपेपणा ही सापेक्ष गोष्ट असल्याने नेमके काय केल्याने मराठी सोपी होईल ह्याच्या विविध व्यक्तींच्या विविध कल्पना परस्परांशी जुळत्या नसतात. संस्कृत संज्ञा टाळाव्या ही वारंवार करण्यात येणारी सूचना तपासून पाहायला हवी. सामान्यतः मराठीसाठी रचण्यात

येणाऱ्या संज्ञा ह्या संस्कृत भाषेतील संज्ञा नसतात तर संस्कृतभाषाजन्य संज्ञा असतात. म्हणजे संस्कृताचे व्याकरण वापरून मराठीसाठी तयार केलेल्या ह्या संज्ञा असतात. स्वातंत्र्योत्तर काळात अशा संज्ञा प्राध्यान्याने निर्माण झाल्या; कारण त्या अखिल भारतीय स्तरावर विविध भाषाभेद ओलांडून लोकांना कळू शकतील असा (गैर)समज होता. पण ह्या प्रश्नाची दुसरी बाजू म्हणजे मराठीच्या व्याकरणाचा अभ्यास होऊन मराठी शब्दसिद्धीची प्रक्रिया तपशिलाने मांडून संज्ञा निर्माण करण्याचे काम पुरेशा तपशिलात (संस्कृत संज्ञा नकोत असे म्हणणारे धरून) कुणीही केल्याचे दिसत नाही. बऱ्याच जणांचा कल अशा संज्ञा घडवण्याऐवजी रूढ इंग्लिश संज्ञा वापरण्याकडे आहे. भाषांतील भेद हे मुख्यत्वे रूपांचे (ध्वनिरूपांचे) भेद असतात. अर्थाच्या अभिव्यक्तीला तत्त्वत: कोणतेही रूप चालते; कारण रूप आणि अर्थ ह्यांचा संबंध संकेतजन्य असतो. पण आपण जो रूपभेद वापरतो त्यात नव्या रचना नव्या संकेतांशी जोडून नवीन चिन्हे तयार करणे हे सर्जनशील काम आहे. ते टाळून निव्वळ अन्य भाषांतील शब्द स्वीकारून भाषा समृद्ध होणार नाही.

शासनव्यवहारकोशात ट्रॅक्टरसाठी कर्षित्र असा पर्याय दिलेला आहे. यंत्रवाचक सर्व संज्ञा इत्र ह्या प्रत्ययाने साधणे (उदा० जनित्र, खनित्र) हा त्यामागचा तर्क समजला तरी कृष् > कर्ष + इत्र हा प्रवास संस्कृत न येणाऱ्या व्यक्तींना सहजसाध्य नाही. त्यासाठी एक तर (केवळ इंग्लिश संज्ञेला कोणती मराठी संज्ञा पर्यायी आहे इतकेच न सांगता) ह्या संज्ञांची घडण आणि त्यांचा त्या घडणीशी सुसंगत अर्थ समजावून देणारी साधने निर्माण व्हायला हवीत. नाही तर सरळ मराठी शब्दसिद्धीचा अभ्यास करून नांगरगाडा (रणगाडा > नांगरगाडा) ह्यासारखी संज्ञा निर्माण करणे बरे. 'कर्षित्र'ची घडण समजावून देण्याची साधने निर्माण करणे किंवा 'नांगरगाडा' ही संज्ञा घडवण्यासाठी शब्दसिद्धीचा नीट अभ्यास करणे ह्या दोन्ही पर्यायांपेक्षा 'ट्रॅक्टर' हीच संज्ञा वापरणे हा पर्याय सोपा आणि सोयीचा असला तरी टाळलेला बरा. तो पर्याय निरुपाय असेल तिथेच वापरावा.

**संगणकावरील मराठीचा वापर**

संगणकावर मराठीचा वापर वाढण्यासाठी करण्यात आलेल्या शिफारशी अमलात आणण्यासाठी उपलब्ध असलेल्या काही उपाययोजनांचा विचार केला पाहिजे.

**युनिकोड संकेत, टंक, इन्स्क्रिप्ट कळपाट (कळफलक की बोर्ड) आणि आज्ञावली (प्रोग्रॅम) ह्याविषयी जागृती**

संगणकावर मराठीचा वापर करण्याची प्राथमिक अट म्हणजे माहिती नोंदवण्यासाठी वापरण्यात येणारा संकेत. युनिकोड ह्या संकेताचा वापर सध्या तुलनेने वाढला असला तरी त्याविषयी लोकांत अजूनही पुरेशी माहिती पोहोचलेली नाही. अनेकांना युनिकोड ही एक आज्ञावली (सॉफ्टवेयर) आहे असे वाटते. आज्ञावली आणि संकेत ह्यांतला भेद सर्वसामान्यांपर्यंत पोहोचणे आवश्यक आहे. लोकांच्या ह्या अज्ञतेचा लाभ घेऊन काही





अनुक्रमणिका

जण कोणत्याही संगणकातील कार्यकारी प्रणालीत (ऑपरेटिंग सिस्टिममधे) आधीच आणि विनामूल्य उपलब्ध असणारी ही सोय उपलब्ध करून देण्यासाठी पैसे आकारून लोकांना लुबाडतात; तसेच चुकीची माहिती पसरवतात. मराठीचा वापर करण्यासाठी युनिकोड-संकेत वापरणाऱ्याच आज्ञावल्या सर्वत्र वापरात येणे आवश्यक आहे. अनेकदा संगणकावर माहिती भरण्यासाठी ती इंग्लिश भाषेत भरण्यास भाग पाडण्यात येते; कारण युनिकोड संकेताद्वारे मराठीही तितकीच संगणकसुकर झाल्याची माहितीच नसते. माहिती साठवण्यासाठी युनिकोड-संकेताचा वापर करणे, माहिती नोंदवण्यासाठी युनिकोड-आधारित टंक (फॉण्ट) वापरणे आणि इन्स्क्रिप्ट हा कळपाटाचा आराखडा वापरून टंकलेखन करणे ह्या गोष्टी अनिवार्य करण्याची आवश्यकता आहे.

इन्स्क्रिप्ट हा भारतीय मानक ब्युरो ह्या केंद्रशासनाच्या संस्थेने प्रमाणित केलेला आराखडा आहे. पण टंकलेखन शिकवणाऱ्या विविध संस्थात मराठी टंकलेखनासाठी प्रमाणेतर आराखडे वापरण्याचे शिक्षण देण्यात येते. एमएससीआयटीपासून ते यच्चयावत सर्व संगणकीय अभ्यासक्रमांत मराठी टंकलेखन शिकवण्यासाठी इन्स्क्रिप्ट हाच आराखडा वापरण्यात आला पाहिजे.

**मुक्त (फ्री ॲण्ड ओपन सोर्स) आज्ञावल्या आणि मराठी**

संगणकातील कार्यकारी प्रणाली (ऑपरेटिंग सिस्टिम) कोणतीही असली तरी मराठीचा वापर सहज शक्य आहे. पण विविध संगणकीय आज्ञावल्यांचे मराठीकरण वेगाने व्हायचे असेल तर मुक्त (फ्री ॲण्ड ओपन सोर्स) आज्ञावल्यांचा आग्रह धरणे आवश्यक आहे. ह्या आज्ञावल्या वापरकर्त्यांना

०१. आज्ञावली हवी तशी वापरण्याचे

०२. त्या आज्ञावलीची प्रत करून इतरांना देण्याचे

०३. आपल्याला आवश्यक ते बदल त्या आज्ञावलीत करण्याचे

०४. बदल करून सुधारित आज्ञावली वितरीत करण्याचे

अशी चार स्वातंत्र्ये देतात. तसेच त्या विनामूल्यही उपलब्ध असतात. त्यामुळे अशा आज्ञावल्यांतील संगणकाच्या पडद्यावर दिसणाऱ्या साहाय्याच्या सूचनांचे मराठी भाषांतर करून त्यांच्या मराठी भाषिक आवृत्त्या वितरीत करणे सोपे आहे. अशा आज्ञावल्या आज बहुसंख्येने उपलब्ध आहेत. त्या जगातील इतर भाषांत भाषांतरित झालेल्याही आढळतात; पण त्यांच्या मराठी भाषिक आवृत्त्या आढळत नाहीत. ह्यासाठी आज्ञावल्यांतील सूचनांच्या मराठी भाषांतरांना प्रोत्साहन देण्यासाठी पुरस्काराची योजना राबवणे शक्य आहे.

काही आज्ञावल्या मराठीत काम करण्यासाठी उपयुक्त असल्या तरी त्यांत त्यासाठी सुधारणा करण्याची आवश्यकता आहे. उदा० अडोब पेजमेकर, अडोब इन-डिझाइन, मायक्रोसॉफ्टचे पब्लिशर ह्या स्वामित्वाधीन (उपरोक्त स्वातंत्र्ये न देणाऱ्या)

आज्ञावल्यांप्रमाणेच अक्षरजुळणीसाठी उपयुक्त अशी स्क्रायबस ही मुक्त आज्ञावली आहे. पण त्यात देवनागरी नीट दिसण्यासाठी सुधारणा होणे आवश्यक आहे. ती झाल्यास मराठीच्या अक्षरजुळणीसाठी ही मुक्त आज्ञावली उपलब्ध होऊ शकेल. तसेच संगणकविज्ञान आणि आज्ञावल्या ह्यांविषयीची अनेक पुस्तकेही मुक्त परवान्यांतर्गत उपलब्ध आहेत. त्यांच्याही भाषांतरांसाठी प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. युनिकोडपूर्व विविध प्रमाणेतर संकेतांतील सामग्रीचे युनिकोडसंकेतात रूपांतर करून देणारी मुक्त आज्ञावली निर्माण करून लोकांना उपलब्ध करून दिल्यास मराठीत संगणकावर आधी झालेले कामही युनिकोड संकेतात आणण्यास साहाय्य होईल.

### इंग्लिश माध्यमातील विद्यार्थी आणि मराठी भाषा

मराठी भाषेचे हे पुढील २५ वर्षांचे धोरण खरोखर कार्यान्वित होऊन यशस्वी व्हायचे असेल तर समोर असणाऱ्या एका मोठ्या अडचणीचा विचार करणे अनिवार्य आहे. **इंग्लिश माध्यमात शिकणारी नवी पिढी पुढील २५ वर्षांत कारभार चालवण्यात सहभागी होणार आहे. मराठीपासून दुरावलेल्या ह्या पिढीला केवळ मनोरंजन, कथाकवितांपुरतीच (क्वचित् तितकीही नाही) मराठी माहीत आहे. ज्ञानभाषा म्हणून मराठीच्या घडणीसाठी मराठीपासून दुरावलेल्या ह्या पिढीकडून कसे काम करून घ्यायचे ह्यासाठी कोणतीही ठोस शिफारस धोरणाच्या मसुद्यात आढळत नाही.** मराठीकडे असलेले माणूसबळ टिकवून ठेवणे आणि मराठीपासून दुरावलेले बळ पुन्हा तिला मिळवून देणे ह्या गोष्टींकडे लक्ष देण्याची आवश्यकता आहे. इंग्लिशमधून शिकणे हा आपद्धर्म आहे आणि मराठीतूनच सर्व ज्ञानव्यवहार करणे हाच धर्म आहे, ह्याचे भान कोणत्याही कारणाने इंग्लिशकडे वळलेल्या पिढीला देण्याची आवश्यकता आहे. मराठीच्या विकासासाठी मराठीतून चाललेली चर्चा आज तरी ही मुले वाचत नाहीत; पण त्यांना मराठीकडे, तिच्या समस्यांकडे आणि शेवटी विकासाकडे वळवणे महत्त्वाचे आहे.

### मराठी आणि इतर आधुनिक भाषा

मराठीचे अस्तित्व आणि तिला असलेल्या धोक्याचा विचार करताना आपण इतर काही गोष्टींचाही विचार करणे आवश्यक आहे. फार मोठा मराठी समाज इंग्लिशकडे वळण्याचे कारण म्हणजे त्याला बाह्य जगाशी संवाद साधण्याचे तेवढेच एक साधन उपलब्ध आहे. इंग्लिशेतर जागतिक भाषांशी आपला संबंध फारसा जुळून आलेला नाही. आपल्याकडील विद्यापीठांत इतर जागतिक भाषा (उदा० चिनी, जपानी, डॉइश्(जर्मन), फ्रेंच, स्पॅनिश, इतालियन इ०) शिकवण्याचे वर्ग चालतात; पण त्यांचे माध्यम इंग्लिश हेच असते. मराठीतून ह्या इतर आधुनिक भाषा शिकवणाऱ्या यंत्रणा उभ्या करणे व त्या भाषांतील विविध विषयांवरील ग्रंथ थेट मराठीत अनुवादित करण्यास प्रोत्साहन देणे आवश्यक आहे.

अनेकदा मराठीचे डोळे आणि इंग्रजीची खिडकी असे एक रूपक मांडण्यात येते. रूपक म्हणून ते बरेही आहे. इंग्लिश ही जगाकडे पाहण्याची खिडकी आहे हे खरेच आहे. पण ती खिडकी तुरुंगाचीही असू शकेल ह्याची जाणीवही आपल्याला असायला हवी. इंग्लिश भाषेव्यतिरिक्तही जग जाणून घेण्याची माध्यमे आहेत. आपण आपली भाषा इतकी समृद्ध करायला हवी की जग पाहण्याची एक खिडकी म्हणून अन्य भाषकांनाही ती शिकावीशी वाटेल. वरचे रूपक आणखी ताणायचेच तर खिडक्यांतून जग पाहण्यापेक्षा जगाला सर्वस्वाने सामोरे जाणे हेच अधिक श्रेयस्कर आहे.

■

## सरकारचे भाषिक धोरण

भाषेचे प्रश्न समाजात तेढ निर्माण करतात, राष्ट्रीय एकात्मतेला बाधक ठरतात, म्हणून असे प्रश्न उपस्थित करणाऱ्यांची संभावना अनेकदा प्रतिगामी, फुटीरतावादी म्हणून केली जाते. परिणामी, अशा प्रश्नांची फार वाच्यता करायची नाही, शक्यतो त्यावर पांघरूण घालण्याची भूमिका घ्यायची अशी सवय आपण स्वत:ला लावून घेतली आहे. आपल्या राज्यकर्त्यांचीही धारणा भाषेचे प्रश्न सोडवून सुटत नाहीत, ते सोडून दिले की सुटतात अशी बनलेली आहे. विशिष्ट भाषेची बाजू घेतली तर समाजात तेढ निर्माण होईल, अशी भीती वाटत असल्यामुळे भाषेचा कोणताही प्रश्न बेदखल किंवा प्रलंबित ठेवण्याकडे त्यांचा कल असतो. वीज, पाणी, रस्ते यांच्याप्रमाणे भाषा हे एक सामाजिक संसाधन असून त्याचा व्यक्तीच्या व समाजाच्या भौतिक उत्कर्षाशी संबंध आहे हे आपणास तत्त्वत: मान्य असते; पण त्यासाठी वासाहतिक परंपरेने फुकट उपलब्ध झालेली इंग्रजी भाषा असताना आपण देशी भाषांचा वापर व विकास करण्यासाठी काय म्हणून रक्त आटवायचे ?

-प्रकाश परब , दै० लोकसत्ता, १०.०९.२०१४

# ‘मराठीसाठी लोकनागरी’च्या निमित्ताने

दिवाकर मोहनी

श्रीमती पुष्पा फडके ह्यांनी अपार परिश्रम घेऊन सिद्ध केलेला ‘मराठीसाठी लोकनागरी’ हा ग्रंथराज नुकताच हाती आला. त्यांनी त्यासाठी घेतलेल्या कष्टांना त्रिवार नव्हे; शतवार, वंदन करून मी माझे मत पुढे मांडत आहे. माझा त्यांच्याशी बराच मतभेद आहे. त्यांना लेखननियमांचे सुलभीकरण हवे आहे आणि मला ते नको आहे; उलट लेखननियम जुन्याकडे वळविणे इष्ट होईल अशा मताचा मी आहे.

व्याकरण शिकण्याचे एक कारण असे की, आपण सध्या कानांच्या माध्यमांतून म्हणजे श्रवणांतून शिकण्याच्या, गुरुमुखातून विद्या प्राप्त करण्याच्या युगात वावरत आहोत. त्यातून बाहेर पडून आपणास वाचनाच्या, म्हणजे आपल्या डोळ्यांचा जास्तीत जास्त उपयोग करून केलेल्या स्वाध्यायाच्या युगात प्रवेश करावा लागणार आहे. तसे केल्याशिवाय आपल्या वाचनाला गती येणार नाही. पदोपदी जे पूर्वी कानांनी ऐकले नाहीत असे शब्द वाचनात आले तर आपण अडखळू. गंभीर विषयांच्या वाचनात नेहमीच असे पूर्वी न ऐकलेले, नवीन शब्द येणार हे समजून चालले पाहिजे. त्यासाठी कोश पाहण्याची सवय केली पाहिजे. कोश नेहमी हाताशी ठेवले पाहिजेत. सध्या हे होत नाही. (त्यामुळे गंभीर विषयांचे वाचनच मागे पडले आहे.)

हे सारे करणे, गुरुमुखातून शिकण्याऐवजी स्वाध्यायातून शिकणे म्हणजे एका युगातून दुसऱ्या युगात प्रवेश करण्यासारखे आहे. आपले क्षितिज विस्तृत करण्यासारखेच आहे; आणि हे केले नाही, आपल्या लिखित भाषेला उच्चारांच्या विळख्यात बंदिस्त करून ठेवले, आम्ही श्रवणातून (ह्याचा अर्थ असा की लिहिलेल्या शब्दांचा सतत मनात उच्चार करून) वाचत-शिकत राहिलो तर आम्ही ह्या जगात मागे पडू. आज फक्त सद्य:कालीन भाषेवर, त्यातही उच्चारांप्रमाणे लिहिलेल्या भाषेवर सर्वस्वी अवलंबून असलेले लोक खरोखरच मागे पडले आहेत.

आता आपण ‘मराठीसाठी लोकनागरी’ ह्या पुस्तकाकडे वळू. श्रीमती पुष्पा फडके ह्यांच्या एकेका मुद्याचा परामर्श घेऊ. त्यांनी उच्चाराप्रमाणे लेखनाचा हिरीरीने पुरस्कार केला आहे आणि भारतातल्या भाषांचा आणि लिपींचा सविस्तर इतिहास वाचकांपुढे मांडला आहे. त्यासाठी त्यांनी पुस्तकाची सुरुवातीची एकशेनव्वद पाने खर्चली आहेत. त्यात काही विवाद्य विधाने आहेत; पण तूर्त त्याकडे दुर्लक्ष करून पुस्तकाच्या तिसऱ्या विभागापासून आपण सुरुवात करू.

लेखनाचा हेतू अर्थवहन किंवा आशयसंक्रमण हा आहे. उच्चारदर्शन हा त्याचा प्रधानहेतू नसून ते लेखनाचे आनुषंगिक वा अगदी गौण अंग आहे. आपण निरर्थक लेखन करीत नसतो. तेव्हा आपल्या लेखनपद्धतीमुळे थोड्या शब्दांत, त्याचप्रमाणे थोड्या अक्षरांत एकाचे म्हणणे दुसऱ्यापर्यंत पोचेल असे पाहावे. बरे, उच्चार डोळ्यांना दिसूच शकत नाही. तो कानांना ऐकू येतो. मग अक्षरे कोणते कार्य करतात : ती डोळ्यांना दिसल्यानंतर काही ध्वनिविशेषांचे साक्षराला स्मरण करून देतात. ते ध्वनिविशेष वाचकाच्या पूर्वीपासून परिचयाचे असतील तर त्याला त्यांच्या आशयापर्यंत जाता येते. हे फक्त साक्षर डोळसांच्या बाबतीत घडते. दृष्टीहीनांना लिखित वा मुद्रित अक्षरांचा काहीही उपयोग नसतो. त्यांना स्पर्शातून उच्चाराचे स्मरण होते. जन्मबधिरांना कोणत्याच उच्चारांचे स्मरण होत नाही. तरी त्यांना अक्षरे डोळ्यांनी पाहून त्यांच्या आशयापर्यंत पोचता येते. आणि ज्यांना वाचता-ऐकता येते त्या सर्वांना अक्षरे वाचून एकाच उच्चाराचे स्मरण होते काय, तर तसेही नाही. त्यांना त्यांच्या प्रदेशातला, जो उच्चार त्यांनी, त्यांच्या बालपणी ऐकला असेल त्याचे स्मरण होते. त्यामुळे पुष्कळांचा न/ण, ऊ/वू, श/ष/स, ऋ/रु, ळ/ल/ड/र/य ह्या आणि ह्यांसारख्या वर्णांमध्ये सतत घोटाळा होत राहतो. मग उच्चाराप्रमाणे लेखन हे तत्त्व मान्य केल्यास कोणाच्या उच्चाराप्रमाणे?

श्रीमती फडके ह्यांनी ह्या प्रश्नांचे उत्तर, माझ्या आकलनाप्रमाणे एका ठिकाणी शिष्टांच्या सभोचित उच्चाराप्रमाणे, असे दिले आहे तर दुसरीकडे पुण्याच्या कोकणस्थ ब्राह्मणांचे उच्चार त्यांना प्रमाण वाटतात असे म्हटले आहे. ह्या दोन्ही गोष्टी मला पटण्यासारख्या नाहीत. कारण त्यामुळे शिष्ट कोण आणि कोणाच्या सभा अशांसारखे प्रश्न निर्माण होतात. ही व्याख्या मान्य केल्यास आज जे उच्चार प्रमाण मानले जातात, त्यापेक्षा वेगळे उच्चार करणारे लोक अशिष्ट आणि अथवा असभ्य आहेत असे म्हटल्याप्रमाणे होते. तेव्हा ही व्याख्या बाद होते. प्रमाण मराठी भाषा जेथे बहुतेकांना (सर्वांना नाही) समजते, (बोलली जाते असे मी म्हणत नाही) तो प्रदेश पुष्कळ विस्तृत आहे. तो उत्तरेकडे आमगावपासून नवापूरपर्यंत आणि दक्षिणेकडे (कोकणी जर मराठीची उपभाषा मानली तर) कासरगोडपासून आसरअलीपर्यंत पसरलेला आहे. इतक्या विस्तृत प्रदेशात उच्चारभेद असणारच. तेव्हा प्रमाणभाषा सगळ्यांच्याच उच्चाराहून वेगळी ठेवणे इष्ट होय. मराठीचे विद्वान कधी एकदा ही गोष्ट मान्य करतात असे मला झाले आहे.

लेखिकेचे दुसरे गृहीतक संस्कृत भाषा मराठीची जननी आहे असे आहे. त्या गृहीतकावर त्यांनी आपल्या तर्काची इमारत रचली आहे. हे गृहीतकसुद्धा अतिशय विवाद्य आहे.

संस्कृतभाषा जेव्हा भारतभरात बोलली जात होती असे म्हणतात तेव्हा भारताची लोकसंख्या किती असेल, त्या लोकांची शिक्षणाची पातळी काय असेल, तेव्हाच्या

भारतवासीयांची संपर्कसाधने कोणती असतील असे प्रश्न मला पडतात. तेव्हा नगरवासीयांच्या संख्येपेक्षा ग्रामवासीयांची आणि अरण्यवासीयांची (म्हणजे किरात-कैवर्तकांची) संख्या आजच्यापेक्षा पुष्कळ जास्त असणार. ते सारे निरक्षर लोक, इतकी प्रगल्भ भाषा की जिचे व्याकरण अवगत वा कण्ठगत करण्यासाठी आजच्या विद्वानांना अनेक वर्षे लागतात, कोठल्याही प्रयत्नांशिवाय, सहजपणे वापरत होते ह्यावर माझा विश्वास नाही. दुसरी गोष्ट अशी की संस्कृत शिकविण्याची वर्षानुवर्षांची, कदाचित आरंभापासूनची. पद्धत परकीय भाषा शिकवावी अशी आहे. अशी परिस्थिती असताना ती केवळ ग्रंथलेखनाची भाषा होती, ती तेव्हाच्या प्राकृत भाषांवर संस्कार करून घडविली होती (तिचे नावच तसे सांगते.) ह्या संस्कृतपूर्व प्राकृत भाषा लिखित स्वरूपात आढळत नसल्या (कारण तेव्हा लेखनच नसणार) तरी त्या अस्तित्वातच नव्हत्या असे अनुमान करणे चुकीचे ठरेल आणि आम्ही संस्कृतमधून तिचे साधितशब्द मोठ्या प्रमाणात घेतले आहेत आणि प्रत्येक स्थानिक भाषेने आपापले विभक्तिप्रत्यय त्याचप्रमाणे आख्यातप्रत्यय त्या शब्दांना लावले आहेत असे मानणे योग्य ठरेल. आपल्या आजच्या भाषा जर खरोखरच संस्कृतपासून निघालेल्या असत्या तर आपल्या भाषांत संस्कृतच्या आख्यातप्रत्ययांसकटच्या शब्दांचे अपभ्रंश सर्रास आढळले असते. इतकेच नव्हे; तर सर्वच संस्कृतशब्दांची केवळ अपभ्रष्ट रूपेच आपल्या भाषेत आढळली असती, कोणतेच शब्द तत्सम रूपात सापडले नसते. तेव्हा संस्कृतपासून मराठीसारख्या सद्य:कालीन भाषा निघालेल्या नाहीत. आज उपलब्ध असलेल्या पालीसारख्या प्राकृत भाषा संस्कृतोत्तरकालीन असून त्या तेव्हाच्या जनसामान्यांच्या यथातथ्य उच्चारांप्रमाणे नाहीत. ते अपभ्रष्ट संस्कृत आहे. त्यामध्ये संस्कृत भाषेला खेडवळ रंग दिला असण्याची शक्यता पुष्कळ आहे.

थोडक्यात काय तर भाषेचा प्रवास दुर्बोधतेकडून सुबोधतेकडे झाला नसून उलट दिशेने म्हणजे सुबोधतेकडून दुर्बोधतेकडे झाला आहे असे मानणे इष्ट आहे.

देवनागरी लिपीविषयीची त्यांची मतेही तथ्याला धरून नाहीत. देवनागरी लिपी आणि तिच्यातील जोडाक्षरे ह्यांची रचना अत्यंत तर्कशुद्ध आहे. आपली लिपी ज्या नियमाने बद्ध आहे तो पुढे सांगतो. बोलताना वा कोणत्याही वर्णाचा उच्चार करताना आपण प्रत्येक व्यंजनाला स्वराचा आधार देतो त्याचप्रमाणे लिहिताना प्रत्येक व्यंजनचिन्हाला स्वरचिन्हाचा आधार देणे आवश्यक आहे. व्यंजनचिन्हे आणि स्वरचिन्हे एकमेकांना चिकटलीच पाहिजे. असा हा नियम आहे. त्यातल्या स्वरचिन्हाला आपण स्वरदंड म्हणू या : क फ छ हे मध्यमस्वरदण्डयुक्त वर्ण होत. ख ग घ च ज झ - ण त थ ध न प ब भ म य र ल व श ष स क्ष ज्ञ ह्यांना आपण अन्त्यदण्डयुक्त, ङ ट ठ ड ढ ह्यांना शिखादण्डयुक्त आणि द ह ह्यांना खण्डितदण्डयुक्त असे म्हणू. ग ण श ह्यांच्यातील व्यंजनचिन्ह शिरोरेखेच्या साहाय्याने स्वरदण्डाला चिकटविले आहे, त्यामुळे शिरोरेखा हा स्वरचिन्हाचा भाग आहे.

अग्नि, अपराह्ण, आह्निक, आकाङ्क्षा, आपद्ग्रस्त, ब्रह्म, धिक्कार, क्रान्ति, क्लेश, उच्चार, उत्तम, चक्षु, सज्जन, उद्धव, चिद्धन, उद्घाटन, विद्वद्रत्न, विठ्ठल, छत्र, भक्त, वक्तृत्व, उद्द्योत, उपव्याप, दारिद्र्य श्वासोच्छ्वास, उच्छृङ्खल, श्लोक, प्रश्न, विश्व, अन्न, मन्त्र, बह्वंश, प्रद्युम्न, प्रह्लाद, ऱ्हास, राष्ट्र, स्वप्न, प्लुत, इन्द्र, श्रीमद्भगवद्गीता, सिध्दर्थ, ह्या आणि अशासारख्या शब्दांमध्ये एकाच अक्षरात एकापेक्षा अधिक व्यंजने एकाच स्वरचिन्हाला स्पर्श करीत असताना दिसतात. त्यासाठी ती उच्चाराप्रमाणे एकाखाली एक अशी रचली आहेत. कोणत्याही व्यंजनापुढे स्वर आल्यास ते व्यंजन त्या (पुढच्या) स्वराला चिकटले पाहिजे. हा नियम निरपवादपणे पूर्वी पाळला जात होता. वाक्याच्या शेवटी व्यंजन आल्यास त्यापुढे स्वरच नसल्यामुळे ते (व्यंजन) हलन्तचिन्हाने दाखविले जात असे. व्यंजन शब्दाच्या आरंभी किंवा मध्यभागी आल्यास तेथे जोडाक्षरच लिहिले जाई. जोडाक्षरांचे तेवढे टाइप पाडत. जुन्या पुस्तकांच्या छपाईत तीच जोडाक्षरे सर्वत्र वापरात होती. आजही ही बरीचशी जोडाक्षरे असलेले फाँट्स उपलब्ध आहेत. टाइपांच्या संख्येवरचे बंधन लेखनात नसल्यामुळे जुन्या सर्व हस्तलिखित पोथ्यांत ती तशी लिहिलेली आहेत. आपली लिपी यंत्रारूढ करण्याची गरज पडली तेव्हा रोमनच्या चोवीस अक्षरांसाठी बनविलेल्या आयत्या यंत्रावर ती दाटीवाटीने बसविली. त्यामुळे अक्षरसंख्येवर बंधने आली. आपल्या जुन्या तर्कशुद्ध लिपीची मोडतोड झाली आणि देवनागरीच्या रचनेच्या मागील शुद्ध तर्क वाचकांच्या कायमचा नजरेच्या आड गेला. ह्या सर्व जोडाक्षरांमध्ये जे व्यंजन आधी उच्चारले जाते ते वर आणि नंतर उच्चारले जाणारे खाली अशीच रचना आहे. नाट्य, पाठ्य, जाड्य, आढ्य अशा शब्दांमध्ये य खाली उतरला आहे. राष्ट्र मधल्या खालच्या चिन्हात डावीकडचा भाग र चा आणि उजवीकडचा अ चा आहे (म्हणजे डावा व्यंजनाचा आणि उजवा स्वरदण्डाचा आहे.) 'प्र'मध्ये जो 'र'चा भाग 'प'च्या खाली आहे तोच 'ट्र'मध्ये डाव्या बाजूला आहे. आपल्या लिपीत 'र' एकदाच शिरोरेखेच्या वर जातो. त्याचे कारण त्याचा उच्चार त्या वर्णात सर्वात अगोदर होतो त्याचप्रमाणे तो स्वरचिन्हाला चिकटवावयाचाही असतो हे आहे. उदा० कीर्ती. आपले उच्चार हुबेहूब दाखविणे कोणत्याही लिपीला शक्य नसते.

ह्यापुढे वाचकाची सोय पाहणे म्हणजे काय ते पुन्हा पाहू या. सामान्यजनांसाठी लेखननियम सोपे करावे असे म्हटल्याने त्यांच्या बुद्धीसामर्थ्याबद्दल शंका घेतल्यासारखे होते. ते मला अजिबात करावयाचे नाही. पूर्वीच्या पिढीचे सगळेजण एकमेकांना पत्रे लिहितानासुद्धा तत्कालीन लेखननियम सहजपणे पाळीत; कारण त्यांना योग्य वयात आपल्या भाषेचे व्याकरण शिकविले जाई.

माणूस बोलू लागला त्याला लक्षावधी वर्षे झाली आणि तो लिहू लागला त्याला जेमतेम चारपाच हजार वर्षे झाली आहेत. आणि लेखनकला सर्व मानवांना साध्य होत नाही. आजही कोट्यवधी लोक निरक्षर आहेत. हाताने रेखलेली काही संकेतचिन्हे

आपल्याला आणि दुसऱ्याला ध्वनिविशेषांचे वा आशयाचे स्मरण करून देऊ शकतील आणि त्यामुळे त्याला अर्थबोध होऊ शकेल हे माणसाला अगदी अलीकडे सुचले आहे. त्यामुळे वाचन अजून सर्वांच्या आटोक्यात आलेले नाही. वाचन करताना आपल्या डोळ्यांना दिसणाऱ्या आकृतीचे आधी आपण ध्वनी आणि नंतर अर्थात परिवर्तन करीत असतो; पण एकदा त्या दृश्य संकेतांचा चांगला परिचय झाला की मधली ध्वनीची पायरी आपोआप गळून जाऊ शकते. एका कटाक्षात आपल्याला अर्थच ग्रहण करता येतो. त्यामुळे द्रुतवाचन शक्य होत असते. लेखन हे दृश्य संकेत आहेत. ते पुन:पुन्हा बदलले तर त्यांची डोळ्यांना सवय होत नाही. आणि सवय नसल्यास वाचनगती मंदावते. एका प्रकारच्या जोडाक्षरांची डोळ्यांना सवय झाल्यानंतर दुसऱ्या प्रकारचे जोडाक्षर आल्यास आपण अडखळतो. आपल्यास ते निरखून पाहावे लागते. दर वेळी प्रत्येक अक्षराचा मनात उच्चार करावा लागतो. असे वारंवार झाले म्हणजे वाचनाचा शीण होतो. वाचन कंटाळवाणे होते. महाराष्ट्रात पुस्तकांचे आणि नियतकालिकांचे प्रकाशक ज्याप्रकारची जोडाक्षरे वापरतात त्यापेक्षा, एकटी बालभारतीच वेगळी जोडाक्षरे (तोडाक्षरे!) वापरते. त्यांच्या हट्टामुळे सामान्य मुलांचे अतिशय नुकसान झाले आहे. हुशार मुले आपली वाट काढून घेतात. सामान्य मुले मागे राहतात. (पण सामान्य मुलांची काळजी कोणाला? आपले मूल चमकले की झाले!) पुढे एक दोन शब्द लिहून दाखवितो. (आपद्ग्रस्त - आपद्ग्रस्त - आपद्ग्रस्त - आपद्ग्रस्त- आपद्ग्रस्त - आपद्ग्रस्त, द्वन्द्व - द्वंद्व - द्वंद्व - द्वंद्व - द्वंद्व - द्वन्द्व - द्वन्द्व - द्वन्द्व) विद्वानांनी लेखननियमांशी खेळू नये असे मला वाटते. ते एवढ्यासाठीच. आपण नेहमी लेखकांच्या सोयीपेक्षा वाचकांची सोय महत्त्वाची मानली पाहिजे.

जसे एखाद्या समुदायात गायक कमी असतात, चित्रकार थोडे असतात, तसेच चांगले लेखकही फार थोडेच असणार हे आपण मान्य केले पाहिजे. त्या थोड्यांना हुडकून काढून लेखननियमात तरबेज केले पाहिजे. सगळ्या विद्यार्थ्यांना लेखननियम शिकविलेच पाहिजेत; पण ते त्यांना पुढे येणाऱ्या शब्दांचे पूर्वानुमान करून वाचनात गती यावी ह्यासाठी आणि त्यांच्यापैकी कोण चांगला लेखक बनू शकतो ते शोधून काढण्यासाठी. शुद्धलेखनाचे नियम कितीही सोपे केले तरी ते काही मुलांच्या आटोक्याबाहेरच जाणार. सर्व मुलांची आकलन-क्षमता सारखी नसते हे शिक्षकांनी मान्य करून मागे राहणाऱ्यांकडे सहानुभूतीने पाहिले पाहिजे. तुच्छतेने नव्हे ! अशा मुलांना भाषा शिकविण्याच्या पद्धती बदलल्या पाहिजेत. त्यासाठी दृक्श्राव्य साधने निर्माण केली पाहिजेत. नियम सोपे केले तर कालपर्यंत छापलेली सगळी पुस्तके वाचकांसाठी दुर्बोध होऊन बसतील. जुनीनवी पुस्तके एकाच वेळी वाचायची असतील तर वाचकाची तारांबळ उडेल. एकदा शिकलेले विसरावयाचे आणि नवीन शिकावयाचे आणि असे पुन:पुन्हा करावयाचे म्हणजे कठीण काम आहे.

लेखिकेने आपल्या सूचना मराठीसाठी आहेत; संस्कृत लिहिताना काही अक्षरे वाढवावी लागतील असे म्हटले आहे. मी प्रामुख्याने मुद्रक आणि वाचक असल्यामुळे जेथे संस्कृत आणि मराठी एकत्र किंवा एकाखाली एक असे छापावयाचे असेल तर काय करावे लागेल, हिंदी-मराठी एकत्र असेल तर काय, जुन्या पोथ्या पुन्हा छापताना काय करावयाचे, नव्या कवींनी वृत्तबद्ध कविता लिहिल्यास त्या कशा छापावयाच्या असे अनेक प्रश्न मला पडतात. आपल्याला मराठीतील अराजक नष्ट करण्यासाठी काहीतरी नवीन सुचले आहे ह्या उत्साहाच्या भरात आम्हा वाचकांच्या आणि मुद्रकांच्या समस्यांकडे लेखिकेचे लक्ष गेले नाही की काय ? आणखी एक शंका : त्यांच्या लोकनागरीमुळे पुस्तकांची पाने वाढतील हे त्यांच्या लक्षात आले आहे, पण त्यामुळे सगळ्याच मुलांच्या पाठी, त्यांचे खांदे, दप्तरे जड झाल्यामुळे दुखू लागतील. पुस्तकांच्या किमती दिढीदुपटीने वाढतील, पुस्तकप्रकाशकांना जास्त प्रशस्त गोदामे घ्यावी लागतील, पोस्टाचे आणि कुरियरचे काम त्या वजनाच्या प्रमाणात वाढेल ह्यावर उपाय काय ते त्यांनी सांगितले नाही. अक्षरांचा आकार लहान करून किंवा ह्यापुढे कागदावर लिहिलेले वा छापलेले न वाचता कॉम्प्युटरच्या पडद्यावरचेच वाचावयाचे असे ठरवून ह्या अडचणींवर उपाय शोधता येईल; पण त्यामुळेही वाचकांचा त्रास वाढेल... लेखकांची सोय पाहिल्यामुळे वाचकांचा त्रास वाढण्याची शक्यता त्यांनी लक्षात घ्यावी एवढेच.

आजवर स्वातंत्र्यवीर सावरकर, विनोबा भावे, काका कालेलकर अशा विद्वानांनी लिपी सुधारणा सुचविल्या आणि त्यातल्या काही पचनी पडण्यासारख्या होत्या तरी सामान्य वाचकांनी त्या नाकारल्या. बालभारतीने केलेल्या सुधारणा इतर प्रकाशकांनी आपली पुस्तके त्या पद्धतीने न छापून नाकारल्याच आहेत. तेव्हा श्रीमती फडके ह्यांनी लेखननियमांची ही दुसरी बाजू समजून घ्यावी आणि आपला सुलभीकरणाचा आग्रह सोडून द्यावा अशी त्यांस नम्र विनंती आहे. ■

**तत्त्वज्ञान**

तत्त्वज्ञान केवळ विद्यापीठीय, महाविद्यालयीन उच्च पातळीवरच अभ्यासले गेले पाहिजे, हा आग्रह पूर्ण सोडून दिला पाहिजे. पाश्चात्त्य-युरोपीय राष्ट्रांमध्ये तत्त्वज्ञान अतिशय महत्त्वाचे मानले जाते. विविध प्रकारच्या संशोधनाला उत्तेजन देऊन संशोधनाचा उपयोग केला जातो. भारतीय समाजात विविध कारणांनी, तत्त्वज्ञान या विषयाला सरकार, धोरणकर्ते शिक्षणसंस्थाचालक, प्राचार्य यांच्या पातळीवर काहीही महत्त्व उरलेले नाही. आजची स्थिती तर फारच वाईट आहे.

-श्रीनिवास हेमाडे , दै० लोकसत्ता, २५.१२.२०१४

# संत रचनांतील व्यावसायिक बोली

- फुला बागूल

समाजातील विविध व्यावसायिक आपापल्या व्यवसाय-क्षेत्रांत जी विशिष्ट बोली बोलतात, तिला व्यावसायिकांची बोली म्हटले जाते. व्यवसाय करताना विशिष्ट शब्द पुन:पुन्हा उच्चारले जातात. यामुळे असे व्यवसायनिष्ठ शब्द त्या-त्या व्यावसायिकांचे म्हणून वर्गीकृत केले जातात. गावगाड्यात अलुते-बलुते अशी रचना असते. दैनंदिन जीवनात एकमेकांशी त्यांचा नित्य संपर्क येत राहतो. भाषिक आदानप्रदान. संज्ञापन होत राहते. तरीही सुताराच्या तोंडी येणारे व्यवसायनिष्ठ शब्द कुंभाराच्या तोंडी येत नाहीत. वैद्यकीय व्यावसायिकाच्या तोंडी येणारे व्यवसायसंबंधित शब्द सोनाराच्या मुखी येत नाहीत. या विभागणीतून भाषेच्या अभ्यासार्थ 'व्यवसाय बोली' या संकल्पनेचा जन्म झाला.

व्यावसायिक बोली ही आधुनिक भाषा विज्ञानातील संकल्पना असली तरी त्या बोलींचे अस्तित्व मध्ययुगीन संत-साहित्यात, विशेषत: बहुजन-संतांच्या निर्मितीत विशेषत्वाने आढळून येते. बहुजन संतांनी आपल्या अभंग-निर्मितीत आपापल्या व्यावसायांतील शब्द रूपके, प्रतिमांच्या रूपाने योजले. हे शब्द त्या-त्या संतांच्या व्यवसायाचे निदर्शक आहेत.

संत नरहरी सोनार यांनी आपल्या अभंगांत आपल्या सोनारकी व्यवसायातील शब्द योजले आहेत. उदा०

देवा तुझा मी सोनार ।
तुझे नामाचा व्यवहार ॥
देह बागेसरी जाणे ।
अंतरात्मा नाम सोने ॥
त्रिगुणाची करुनी मुस ।
आत ओतिला ब्रह्मरस ॥
जीव शिव करुनी फुकी ।
रात्रंदिवस ठोकाठोकी ॥
विवेक हातोडा घेऊन ।
कामक्रोध केला चूर्ण ॥
मनबुद्धीची कातरी ।

रामनाम सोने चोरी ॥
ज्ञान ताजवा घेऊन हाती ।
दोन्ही अक्षरें जोखिली ॥

संत नरहरींनी देहाला वागेसरी (दागिना) तर अंतरात्म्याला सोने म्हटले आहे. त्रिगुणांच्या मुशीत ब्रह्मरस (द्रवरूप सोने) ओतला. सोनारी व्यवसायातील फुंकणे, ठोकणे या क्रियांचा निर्देश केला. विवेकरूपी हातोड्याने कामक्रोधाचे चूर्ण केले. मनबुद्धीच्या विवेकशक्तीला कातरी तर रामनामाला सोने संबोधले. व्यवसायातील वस्तू, पदार्थांना 'रूपक' बनवले.

संत नामदेवांनीही आपल्या अभंगांत आपल्या व्यवसायातील शब्द योजले. व्यवसायाशी निगडित शब्दांना रूपक, प्रतिकांचा साज चढवला. उदा०

शिंपियाचें कुळीं जन्म मज जाला । परि हेतु गुंतला सदाशिवी ।
रात्रीमाजी शिवीं दिवसामाजी शिवीं । आराणुक जीवी नाही माझ्या ॥
सुई आणि सातुळी कात्री गज दोरा । मांडिला पसारा सदा शिवी ।
नामा म्हणे शिवी विठोबाची अंगी । त्याचेनि मी जगी धन्य झालो ॥

कपडे शिवण्याच्या क्रियेचा निर्देश, सुई-सातुळी-कात्री-गज-दोरा-अंगी यांचा निर्देश व्यवसायजन्य भाषेच्या प्रांतात समाविष्ट होतो.

संत तुकारामांनी वाण्याचा व्यवसाय केला असला तरी कुणबिकीच्या व्यवसायातील शब्द अभंगात योजिले आहेत. उदा०

गोफणिसी गुंडा घाली पागोऱ्याच्या नेटे
पळती हाहाकारे अवघी पाखरांची थाटे
खळे दाने विश्व सुखी करी होत रासी
सारा सारुनिया ज्याचे भाग देई त्यासी
तुका म्हणे मग नाही आपुले कारण
निज आले हाता भूस सांडिले निकण (११४९)

शेत राखण्याच्या क्रियेशी संबंधित गोफणगुंडा, पागोरा व पिकाशी संबंधित खळे, दाने, राशी, सारा, भूस हे शब्द येथे संत तुकारामांनी योजले आहेत. बलुतेदारीशी निगडित सारा देणे; धान्य काढून झाल्यावर उरलेले वैरण (भूस) हे उल्लेखही कुणबिकीच्या व्यवसायाचा निर्देश करतात.

संत तुकारामांनी अभंग क्र० १०८० ते १०९१ व ११४७ ते ११४९ या अभंगांतही व्यवसायाबोलीतील शब्द योजले आहेत. या अभंगांतून त्यांनी 'घोंगडी'स हरिकृपा तर 'हरिनामा'स शेत कल्पिले आहे.

शं०गो० तुळपुळे (१९६२, पृ० ३६६) यांनी संत तुकारामांच्या या व्यवसायनिष्ठ रूपक-योजनेसंदर्भात म्हटले आहे की, ''ते रूपकाचा आश्रय करीत व प्रपंचाच्या भाषेत परमार्थ सांगत.''

बहुजनातील संतांनी व्यावसायानिष्ठ शब्दांची योजना मोठ्या धाडसाने करतानाच त्या शब्दांचे सामर्थ्यही अधोरेखित करण्याचे महत्त्वपूर्ण कार्य भाषा व संस्कृतीच्या अंगाने केले आहे. त्यांनी योजलेले व्यवसायजन्य शब्द अध्यात्म निरूपणाचे सामर्थ्य बाळगणार आहेत.

संत सावता माळी यांनी तर आपल्या माळ्याच्या व्यवसायाचा संबंध थेट परमार्थ व्यवहाराशी लावला आहे. ते म्हणतात :

''कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी
लसूण मिरची कोथिंबिरी । अवघा झाला माझा हरी
मोट नाडा विहीर दोरी । अवघी व्यापिली पंढरी
सावता म्हणे केला मळा । विठ्ठलपायी गोविला गळा''

विठ्ठल भक्तीचा मळा फुलविणाऱ्या संत सावता यांना कांदा, मुळा व पालेभाज्यात विठ्ठल दिसतो. लसूण, मिरची हेच यांचे भगवंत होतात. मोट, नाडा, विहीर, दोरी या क्षेत्रफळात ते पंढरपूर कल्पितात. अ-साक्षर आणि अध्यात्म मार्गाची गोडी लागलेल्या परंतु तत्त्वज्ञानातील बोजड शब्दांमुळे पूर्ण अर्थ समजू न शकणाऱ्या सामान्य जीवांना संत सावतादि संतांनी दैनंदिन व्यवसायातील शब्द-रूपकांच्या अवगुंठनात योजून मोठाच दिलासा दिला. अशा प्रकारच्या व्यवसायबोलीमुळे फार मोठा वर्ग अध्यात्माकडे आकर्षिला गेला. वारकरी पंथाच्या विकासात आणि या पंथाची पाळेमुळे खोलवर रुजण्यात अशा प्रकारच्या व्यवसायबोलीचे योगदान निश्चितच लक्षणीय आहे.

जात्यावरच्या ओव्या हा तर लोकवाङ्मयाचा अमूल्य ठेवा. श्रमावरील श्रद्धा आणि भावनांचा हिंदोळा यांचे पवित्र मिश्रण ल्यालेला हा प्रवाह असंख्य अनाम मातांनी वाहता ठेवला. संत जनाबाई ही या प्रवाहाची मध्ययुगीन प्रतिनिधी होय. ती आपल्या अभंगात आपल्या नित्य व्यवसायातील (दळण-कांडण) जात्याला अध्यात्माचे गुपित सांगण्यासाठी योजते. अध्यात्माचा आशय आणि ओवी हा आकृतिबंध एकजीव होण्यासाठी जनाबाईने जात्याचे रूपक योजावे ही गोष्ट त्या वेळी तिच्या मनी नसावी. उचंबळून आलेल्या भावनांचा प्रवाह म्हणून ती म्हणून गेली :

सुंदर माझे जाते गे फिरे बहुतेके। ओव्या गाऊ कौतुके तू येरे बा विठ्ठला ।।
जीवशीव दोनी खुंटे गे प्रपंचाचे नेटेगे । लावुनी पांची बोटे गे तू ये रे बा विठ्ठला।।
प्रपंच दळण दळिले पीठ भरिले । सासुपुढे ठेविले तू येरे बा विठ्ठला ।।
सत्त्वाचे आंधण ठेविले पुण्य वैरिले । पाप ते उतू गेले तू ये रे बा विठ्ठला ।।

जाते, खुंट, दळण, पीठ, आंधण, वैरणे, दळणे, उतू जाणे हे जनाबाईच्या व्यवसायाशी निगडित शब्द आहेत. संत सावता माळीप्रमाणेच संत जनाबाईलाही आपल्या व्यवसायातच देव भेटला. खरेतर हा सुद्धा एक प्रकारचा साक्षात्कारच होय. या साक्षात्कारात दिव्य प्रकाश, देह-मन-बुद्धी यांचे भारावलेपण या गोष्टी घडल्या नसतील पण म्हणून काय हे 'देव भेटणे' नाकारता येईल? प्रपंचातच परमार्थ शोधणाऱ्या संतांना, व्यवसायात ईश्वर शोधणाऱ्या संतांना आपल्या व्यवसायाशी निगडित वस्तू-पदार्थ-क्रिया यांच्यात रोजच्या व्यवहारातून निश्चितच काहीतरी सामर्थ्य, गुपित प्रत्ययास आले असेल. त्यातून त्यांनी आत्मविश्वासाने असे व्यवसायजन्य शब्द योजले. कोणत्याही संताने योजलेले व्यवसायनिगडित रूपक व प्रतिमा अर्थशून्य वा अनुचित नाहीत, यावरूनही त्यांचा हा आत्मविश्वास अधोरेखित होतो. संत जनाबाईने योजलेल्या व्यावसायिक बोलीचे समर्थन सुहासिनी इर्लेकरांनीही केले आहे. त्या (१९८०, पृ० २३३) म्हणतात- ''आध्यात्मिक अनुभूतीचा शब्दवेध घेताना ती ज्या सामान्य व दैनंदिन जीवन व्यवहाराशी त्यांचे नाते जोडू पाहते त्याकडे पाहून नाक मुरडणे म्हणजे जनाबाईचे भावजीवनच काय पण तिचे प्रत्यक्ष जीवनही नाकारणे होय. जनाबाईकडून ह्याहून वेगळ्या स्वरूपाच्या प्रतिमांची अपेक्षा करणे म्हणजे तिच्या अव्यभिचारी अनुभवनिष्ठेवरच आघात करणे नव्हे काय?''

आपल्या अभंगरचेनत व्यावसायिक भाषेचे उपयोजन करणाऱ्या संतांनी आपले अव्यभिचारी अनुभवच मांडले आहेत. त्यांच्या या कृतीतून मराठी भाषेचे वैभव वृद्धिंगत झाले आहे.

संत जनाबाईने इतर संत कवयित्रींच्या तुलनेत सर्वाधिक व्यवसायनिगडित शब्द योजले आहेत. उदा०

(१) दळिता कांडिता । तुज गाईन अनंता
(२) झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणी
(३) येऊनिया देव दळू लागे । रखुमाईचा संग दूर केला
(४) साळी सडायास काढी । पुढे जाऊनी उखळ झाडी
(५) जनी जाय शेणासाठी । उभा आहे तिच्यापाठी
(६) जनी जाय पाणीयासी । मागे धावे ऋषिकेशी
(७) देह बुद्धीचे वैरण । द्वैत खडा रे निसून
(८) कोंडा पाखडुनि काढी ।
(९) धुणे घेऊनि कांखेसी ।
(१०) ऐशा येरझारा केल्या । रांजण घागरी भरल्या
(११) गौऱ्या वेचूनि बांधिली मोट । जनी म्हणे द्यावी गाठ
(१२) मोट उचलुन डोईवर घेई । मागे चाले जनाबाई

समाज-भाषाविज्ञानात लिंगभावाधिष्ठित अशी स्त्रियांची भाषा, पुरुषांची भाषा असे वर्गीकरण करण्यात येते. संत जनाबाईच्या वरील अभंगातील अनेक शब्द खास स्त्रियांच्याच तोंडी येणारे शब्द आहेत. पण जनाबाई व्यवसायाने दासी आहे. यामुळे तिच्या तोंडी येणारे शब्द व्यावसायिक भाषा म्हणूनच पाहता येतात. सुहासिनी इर्लेकर (१९८०, पृ० २००) म्हणतात- ''जनाबाईच्या अभंगांतून प्रकटणारे मन हे मूलत: एक स्त्री मन खरे; पण त्यास लाभलेले जीवन हे एका दासीचे आहे. म्हणूनच जनाबाई स्वत:संबंधी जेव्हा बोलू लागते, तेव्हा तिचे हे स्त्रीमन त्यामागील दासीपणासह तिच्या अभंगांतून एकसारखे प्रकट होऊ लागते.''

व्यावसायिक भाषेच्या वर्तुळात इतरही काही रचनांचा समावेश करता येईल, ज्यांचे रचयिते तो-तो व्यवसाय मात्र करीत नाहीत. याचे एक उदाहरण म्हणजे शेख महंमद यांची पुढील रचना :

हरिदुर्बळ । तुझा तेली
सद्गुरूने कृपा केली
औट हात रोविला घाणा
तत्त्वे लाट फिरे जाणा
तीळ कल्पना वासना
शांति बोहोळेवि घाणा
माया-विषय रगडिले
भावतेल निवडिले

या रचनेत तेली व्यवसायातील घाणा, लाट, तीळ, तेल इ० शब्द आले आहेत. शेख महंमद यांनी तेल्याचे रूपक योजले आहे. सद्गुरूने मार्गदर्शन केल्यामुळे साडेतीन हाताच्या देहाच्या घाण्यात वासनेच्या तिळांची घुसळून होऊन त्यात मायादि विकार रगडले जात असून, भक्तिभावाचं तेल निघत आहे. हे सारे प्रपंच व परमार्थ साध्य करणाऱ्या तेल्याच्या रूपकातून शेख महंमद यांनी सांगितले आहे. यावरून व्यवसायभाषेच्या उपयोजनासाठी रचनाकर्त्याचा व्यवसायही तोच असला पाहिजे असा समज आपोआपच दूर होतो.

संत सेना न्हावी यांनीही आपल्या व्यवसायावर पारमार्थिक रूपक रचले आहे. ते म्हणतात :

आम्ही वारीक वारीक । करू हजामत बारीक ।।
विवेक दर्पण आयना दावूं । वैराग्य चिमठा हालवूं ।।
उदक शांती डोई घोळूं । अहंकाराची शेंडी पिळूं ।।
भावार्थाचा बंगला झाडूं । काम क्रोध नखे काढूं ।।





अनुक्रमणिका

येथे न्हाव्याच्या व्यवसायातील शब्द आले आहेत. आपल्या व्यवसायातील प्रत्येक कृती, प्रत्येक उपकरण, प्रत्येक हालचाल पारमार्थिक प्रेरणेतून करणाऱ्याला स्व-व्यवसायातच परमार्थ भरून राहिल्याचा अनुभव येतो. आपले कर्म कसे झाले आहे हे विवेकाच्या आयन्यात पाहणे, वैराग्याच्या कात्रीने इतरांच्या डोक्यात वाढलेले विषयाचे तण काढणे (डोई करणे), उपदेशाचे उदक डोईवर घोळणे (मालीश करणे), अहंकाराची शेंडी पिळणे, कामक्रोधाची नखे काढणे ह्या सर्व क्रियेला प्रा० र० रा० गोसावी (२०१२, पृ० २८) यांनी 'आध्यात्मिक हजामत' म्हटले आहे.

संताजी जगनाडे हे संत तुकारामांच्या १४ टाळकऱ्यांपैकी एक असलेले, संत तुकारामांच्या अभंगाचे पुनर्लेखन करणारे, तुकाराम-गाथेचे मोगली आक्रमकांपासून संरक्षण करणारे एक संत होत. त्यांची स्वत:चीही विपुल रचना आहे. त्यांनी आपल्या तेली व्यवसायातील शब्द आपल्या अभंगात योजून मराठीचे वैभव वाढविले आहे. डॉ० फुला बागूल (२०१३, पृ० ८०) यांनी संताजी जगनाडे यांच्या घाण्यावरील अभंगातील व्यवसायनिष्ठ शब्दांची सविस्तर चर्चा केली आहे.

**व्यवसायनिष्ठ शब्द व रूपक योजना :**

समाजातील विविध व्यावसायिक आपापल्या व्यवसायक्षेत्रात जी विशिष्ट बोली बोलतात, तिला व्यावसायिकांची बोली असे म्हटले जाते. संत जगनाडे यांच्या 'घाण्यावरील अभंग' या रचनेत तेलनिर्मिती या व्यवसायातील अनेक शब्द येतात. हे व्यवसायनिष्ठ शब्द प्रतीकांच्या रूपात येतात आणि अर्थातच त्यामुळे आशय अधिक समृद्ध होतो. पुढील अभंगावरून ते पुरेसे स्पष्ट होईल :

आमुचा तो घाणा त्रिगुण तिळाचा ।
नंदी जोडियला मन पवनाचा ॥
भक्ती हो भावाची लाट टाकियली ।
शांती शिळा ठेवली विवेकावरी ॥
सुबुद्धीची वढ लावोनी विवेकास ।
प्रपंच जोखड खांदी घेतीयले ॥
फेरे फिरो दिले जन्मवरी ।
तेल काढियले चैतन्य ते ॥
संतु म्हणे मी तेल काढियले ।
म्हणुनी नांव दिले संतु तेली ॥१०॥





अनुक्रमणिका

अभंगात अनुक्रमे घाणा, तीळ, नंदी, लाट, शिळा, वढ, जोखड, तेल हे व्यवसायनिष्ठ शब्द आहेत, ते प्रतीकरूप आहेत.

देह क्षेत्र घाणा ऐका त्याच्या खुणा ।
गुदस्थान जाणा उखळ ते ॥
स्वाधिष्ठानावरी मन पुरचक्र ।
विंदु दंत चक्र आनु हात ॥११॥

या अभंगात घाणा, उखळ हे व्यवसायनिष्ठ शब्द आहेत :

आशा, मनशा, तृषा, माया पाचरी चारी आणून ।
दुर्गतीचा खील त्यांमधी दिला ठोकून ॥१६॥

याशिवाय :
मनोभक्तीची करुनी लाठ ।
गुरुकृपेचा बसविला कठ ।
अशी ही संतु तेल्याची लाट ।
कळिकाळाची... फाट ॥२१॥

या दोन्ही अभंगांत पाचरी, खील, लाट, कठ हे व्यवसायनिष्ठ शब्द संताजी जगनाडे यांनी योजले आहेत. हे व्यवसायनिष्ठ शब्द येथे रूपक म्हणूनही विचारात घ्यावे लागतात.

शरीररूपी घाण्यात जो तीळ टाकायचा तो त्रिगुणात्मक हवा. वाऱ्यासारख्या चंचल मनाला नियंत्रित करण्यासाठी 'नंदी' जोडला म्हणजे त्याची चाल गोलाकार व ठरावीक चाकोरीचीच ठेवली. घाण्याचा बैल ती चाकोरी सोडून इतरत्र जाऊच शकत नाही. मनाला असेच नियंत्रित ठेवायचे असते. भक्तीभावनेची लाट (घाण्याच्या उखळात टाकलेली, बिया पिळण्यासाठी असलेली लाकडी लाट) घाण्यात म्हणजे शरीरात टाकली पाहिजे. बियांचे चर्वण चांगले व्हावे म्हणून वजनदार अशी शिळा (दगड) त्या लाकडी लाटेवर ठेवतात. तेलघाण्यारूपी शरीराला मन आणि विचार भक्तिभावपूर्ण व संयमी (शांत) असावेत तरच चिंतन चांगले होईल. विवेकाला वढ (घाण्याच्या बैलास बांधलेली दोरी) लावावी ती सुबुद्धीची. प्रपंचाला हा गाडा ओढायचा हे तर प्रत्येकाच्या नशिबी आलेले आहे; पण प्रपंचात राहूनही मनाला भटकू न देणे, त्याला ईशचिंतनात बांधून ठेवणे, भक्तिमार्गावर चालण्यासाठी मनाला संस्कारित करणे, मन संयमित ठेवणे, विवेक आणि सद्बुद्धीची कास

न सोडणे, अशा नियंत्रित फेऱ्यांतून फिरत फिरत चैतन्याचे तेल काढावे, मनुष्यदेह पुण्यप्राप्तीसाठी झिजवावा, असे तत्त्वज्ञान रूपकांच्या माध्यमातून संत संताजींनी मांडले आहे :

देह क्षेत्र घाणा ऐका त्याच्या खुणा ।
गुदस्थळ जाणा उखळ ते ॥
एकविस मनी खांब जो रोविला ।
सुतार तो भला विश्वकर्मा ॥
मनाशी जुंपले फेरे खाऊ दिले ।
तेल हाता आले सुटे मना ॥
संतु म्हणे माझा घाणा हो देहांत ।
चालवि आपोआप पांडुरंग ॥ (अभंग क्र० ११)

देहरूपी तेलघाणीचे गुदस्थळ हे उखळ आहे. या उखळातून तिळाची ढेप (निरुपयोगी) बाहेर टाकली जाते. टाकाऊ ते टाकण्यासाठी व आवश्यक असे ते काढण्यासाठी तेलघाणीच्या चरकात जो लाकडी खांब असतो तो एकवीस मण वजनाचा असतो. परमेश्वररूपी सुताराने, विश्वकर्म्याने ही घाण्याची म्हणजे शरीराची रचना केली. जीवनसत्त्व शोषून घेणे, टाकाऊ ते बाहेर टाकणे हे कार्य अव्याहतपणे करणारी शरीरयंत्रणा त्या विश्वकर्म्यानेच बनविली. मनरूपी नंदी जोडल्यावर तेल हाती येईल. मनाला नियंत्रित केल्याने चांगले आचारविचार घडतील. माझे हे घाणारूपी शरीर तो परमेश्वरच चालवीत आहे. असे या रूपकांचे विश्लेषण करता येते.

**समारोप :**

साधारणपणे आत्मनिष्ठ स्वरूपाच्या अभंगात 'व्यावसायिक बोली'चे उपयोजन आढळून येते. आपल्या कनिष्ठ मानल्या गेलेल्या व्यवसायाचे उदात्तीकरण करण्याच्या हेतूने असे उपयोजन झाले असावे. आपल्या व्यवसायातच परमार्थ शोधणाऱ्या संतांनी अशाप्रकारची व्यवसाय बोली योजिली आहे. संत रचनेतील व्यवसाय-बोलीचे स्वरूप 'स्वानुभूतीतून साकार झालेले पारमार्थिक रूपक' या प्रकाराचे आहे. बहुजनातील संतांनी आपला उदरनिर्वाहाचा व्यवसाय 'कर्तव्यकर्म' म्हणून केला, त्यामागे ईश्वराची प्रेरणा आहे, हे त्यांनी रचलेल्या पारमार्थिक रूपकांवरूनही दिसून येते. आपल्या अभंगरचनेत व्यवसायजन्य शब्द रूपक/ प्रतिमा/ प्रतीक रूपात योजणाऱ्या संतांना आपल्या व्यवसायाशी निगडित उपकरण - वस्तू-पदार्थ-क्रिया यांच्यातील पारमार्थिक आशयाच्या निरूपणार्थ वसत असलेले सामर्थ्य, गुपित लक्षात आल्याने त्यांनी आपल्या व्यवसायातील





अनुक्रमणिका

शब्दांची योजना केली. या प्रयत्नातून बहुजनातल्या संतांनी मराठीचे वैभव वाढविले यात शंका नाही. संत-रचनेतील व्यवसाय-बोली रूपक आणि प्रतिमा-प्रतीक इत्यादींच्या रूपातून अवतीर्ण झाली आहे.

अलुते-बलुतेदाराशी निगडित शब्दांच्या योजनेमुळे संत-रचना बहुजनांसाठी आकलन-सुलभ झाली. व्यवसाय-बोलीच्या योजनेमुळे फार मोठा वर्ग परमार्थाकडे, पर्यायाने वारकरी पंथाकडे वळण्यास मदत झाली. वारकरी पंथाच्या विकासात आणि या पंथाची पाळेमुळे खोलवर रुजण्यात अशा प्रकारच्या व्यवसाय-बोलीचे योगदान निश्चितच आहे.

**संदर्भ :**


इर्लेकर, सुहासिनी (१९८०), 'प्राचीन मराठी संतकवयित्री : वाङ्मयीन कार्य', परिमल प्रकाशन, औरंगाबाद.

गोसावी, र०रा० (२०१२), 'श्री संत सेनामहाराज चरित्र', सारथी प्रकाशन, पुणे.

तुळपुळे, शं०गो० (१९६२), 'पाच संतकवी', व्हीनस प्रकाशन, पुणे.

बागूल, डॉ० फुला (२०१३), 'संताजी जगनाडे : चरित्र व अभंगाची चर्चा', साक्षात प्रकाशन, औरंगाबाद.


■

**भाषानीती आणि भाषाव्यवहार**

समाजातील भाषिक प्रश्नांना बेदखल करून इंग्रजीचे एकभाषिक वर्चस्व स्वीकारण्याकडे एकंदर समाजाचा कल असला तरी आपली स्वीकृत भाषानीती आणि प्रत्यक्षातील भाषाव्यवहार यांच्यातील विसंगती लक्षात आणून देणे आवश्यक आहे. राज्यापुढील अन्य गंभीर समस्यांमुळे भाषेचा प्रश्न किरकोळ वाटत असला तरी आपण ठरवले काय होते आणि झाले काय, याचा विचार कधीतरी केलाच पाहिजे. महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यानंतर आता अर्धशतक उलटून गेले आहे. एवढ्या मोठ्या काळात राजभाषा व लोकभाषा असलेल्या मराठीला न्यायभाषा करण्याचे आपले स्वप्न किती साकार झाले किंवा ते साकार करण्याची आता आपली इच्छा तरी आहे काय ?

-प्रकाश परब, दै० लोकसत्ता, १०.०९.२०१४

# संत गाडगेबाबांच्या कीर्तनांतील जीवन आणि भाषा

- केशव सखाराम देशमुख

जनभाषा हीच संत गाडगेबाबांची कीर्तनभाषा आहे. संवाद हा या भाषेचा पैलू. एकेका शब्दाचा प्रश्न ते लोकांना विचारतात आणि लोकांचा होकार मिळवतात. या होकारामुळे कीर्तनातला सहभाग मौलिक झाला. परिवर्तनानुकूल ठरला. त्यांनी विचारलेल्या प्रश्नांचे विषय स्वच्छता, जातिनिर्मूलन, अस्पृश्यतानिषेध, गरिबांना मदत, व्यसनमुक्ती, प्राणिमात्रदया, अन्न-वस्त्र-निवारा-विचार, शिक्षण, ज्ञान हे आणि इतर आहेत. समूहाच्या हिताचा आणि गरिबांच्या उद्धाराचा श्रेष्ठ उपक्रम बाबा राबवतात. खेडूत गरीब हा कीर्तनाचा महानायक आहे. शिक्षणाला अग्रस्थान ते देतात. फुले-शाहू-आंबेडकर यांची प्रबुद्ध डोळस विचारधारा हेच संत गाडगेबाबा यांच्याही कार्यविचाराचे प्रधानसूत्र आहे. जीवनाचा धांडोळा घेणे कीर्तनात श्रेष्ठ मानले तर कीर्तनभाषेचा लहेजा, माया, प्रेम, जिव्हाळा यांनी डवरलेला आहे. एकाच वेळी क्रियावंत विचारवंत बाबा त्याच वेळी कमालीचे संवेदनशील आहेत. गरीब ही माझी लेकरे आहेत, हे नाते त्यांनी कधी सुटू तुटू दिलेले नाही. मधुकर केचे यांनी म्हटल्याप्रमाणे, ''बापाने चिडावे आणि मायीने सावरावे'' असा प्रकार बाबांच्या प्रबोधनामागे आहे. दरिद्री जीवन संपावे, प्रगती व्हावी यासाठी शिका हा त्यांचा धडा जीवनशिक्षणाचा आहे. वैदर्भी भाषा त्यांच्या कीर्तनात भिजलेली ओली भाषा आहे. शब्दाशब्दांना या भाषेत मातीचा, मायेचा आणि बदलाचा गंध आहे. या भाषेला खास हेल आहे. इंग्रजी-हिंदीच्या पाण्यात भिजूनही ही भाषा कीर्तनात येते. ती लज्जत वाढविते तशीच ती परिणामही साधते. त्यांना का वेड लागले ? हे वाक्य बाबांच्या कीर्तनात गोड होऊन ''तेइले काय पिसं लागली काय म्हनावं?'' असं येतं तेव्हा बोलीचा गोडवा हा अधिक घनदाट होऊन गोडी व परिणाम वाढवणारा ठरतो. कीर्तनात 'गोपाला गोपाला देवकीनंदन गोपाला'चा गजर व उत्साह वाढवताना ते लोकांना प्रेमानेच दरडावत; आणि म्हणत, ''जिभा झडल्या काय गा तुमच्या. हे तर मरेल मानसांसारखं झालं ! अन काय थे टाळ्या वाजवनं ! तुम्ही टाया वाजवून राह्यले की भाकरी थापून राह्यले. आँ ?'' ही भाषा आणि भाषेतला उत्साहवर्धक आवेग जीवन आणि भाषेचा संगम दर्शवितो.

शिकलात (ज्ञान) तरच जीवन सुधारेल, व्यसनं सोडली तर गरिबी जाईल आणि जाती, शिवाशिव सोडली तर मानवतावादी लोकशाही येईल; हा बाबांच्या कीर्तनातला विचार युग घडविणारा आहे. यातील भाषाशिक्षण व जीवनशिक्षण खूपच मौलिक आहे.

त्याची काळाला आजही निकड आहे. भाषेची लावणी, गोड रूपे त्यांच्या कीर्तनात ते अशी पेरतात :

| | |
|---|---|
| 'हे पाहा' याऐवजी 'हे पाहेजा' | 'मग' ऐवजी 'मभ' |
| 'मग म्हणाल' ऐवजी 'मंग म्हनसान' | 'ठेवणे' ऐवजी 'ठुने' |
| 'का' ऐवजी 'काहून' | 'पाहण्याची' ऐवजी 'पाह्याची' |
| 'पृथ्वी' ऐवजी 'पुर्थई' | 'ऐकून' ऐवजी 'आयकून' |
| 'करण्याची' ऐवजी 'कऱ्याची' | 'काय' म्हणून' ऐवजी 'काहून' |
| 'प्यायले' ऐवजी 'पेले' | 'इतके' ऐवजी 'इतले' |
| 'म्हटले' ऐवजी 'म्हतलं' | 'तव्हापासून' ऐवजी 'ताहापसून' |
| 'प्रत्येकांस' ऐवजी 'पर्तेकाले' | 'परवा' ऐवजी 'परवार' |
| 'काढणार' ऐवजी 'काहाडनार' | 'वाजवतात' ऐवजी 'वाजोतत' |
| 'बायकोला' ऐवजी 'बायकोले' | 'असे असे' ऐवजी 'अशे अशे' |
| 'भांडण' ऐवजी 'कलागत' | 'भाषण' ऐवजी 'भाशन' |
| 'दाखवतो' ऐवजी 'दाखोते' | 'विचारणे' ऐवजी 'पुसणे' |
| 'ख्रिश्चन' ऐवजी 'क्रिश्शन' | 'वेगळंवेगळं' ऐवजी 'वालंवालं' |
| 'नसेल' ऐवजी 'नसील' | 'असशील' ऐवजी 'अशील' |
| 'असेल' ऐवजी 'आशीन' | 'अजून' ऐवजी 'आखीन' |

ही जनभाषा, ही व्यवहारबोली, ही लोकसंवाद शब्दकळा साखरेत भिजवलेली आहे. ही भाषा प्रभावापुरती नाही; ती लोकसुधारणेची भाषा संत गाडगेबाबा करतात. या भाषेचा पल्ला लांब नाही. उलट एका शब्दांची वाक्यं ते बनवतात. लोक होकार मिळवतात. यामुळे लोक सुधारणाप्रवृत्त सहज होतात. कीर्तनात सगळे धडे जीवनशिक्षणाचे आहेत. कीर्तनातही सगळी भाषा बोलीप्रधान आहे.

वैदर्भी बोली इंग्रजी-हिंदीच्या शब्दांनी जास्तीच मिष्ठास बनत जाते. या प्रभावातून बाबांचे कीर्तनही मुक्त नाही. अशी गोड मिश्र भाषा वापरून त्या प्रकारची शब्दरूपे कीर्तनात येतात. उदाहरणार्थ,

'तबियत', 'हुकमान', 'बंबई', 'ठेसन', 'जत्रा', 'फत्रा', 'तीरथ', 'गांधीजीकू' 'पैदा', 'बरसात', 'इस्पिताल', 'खडा', 'बडा', 'साला', 'साली', 'खंटारा', 'चले जाव', 'इधर आ', 'देड आणा', 'लैन', 'मालूम', 'फेपरवारी' (फेब्रुवारी), 'हिंदुस्थान', 'खलास', 'चड्डी', 'चीज', शरम', 'रूमा' (खोल्या), 'बिल्डिंगा' (इमारती), या वळणाची मिश्र भाषांतील शब्दरूपे खास 'अस्तित्त्व' आणि विशेष 'परिणाम' उमटवत संत गाडगेबाबांच्या कीर्तनात येतात. (या केवळ भाषेवर आंतरविद्याशाखीय स्वरूपाचे; पीएच०डी० पदवी गुणवत्तेचे संशोधन होईल. ते भाषेला नवा ऐवज पुरविणारेही ठरेल!)





अनुक्रमणिका

संत गाडगेबाबांच्या कीर्तनातली अवघी भाषा अस्सल आहे. ती गांवभाषा आहे. जिवंतपणा आणि प्रभावात्मकता ही त्या भाषेची वैशिष्ट्ये आहेत.

न शिकलेला समूह हा त्या कीर्तनाचा श्रोता आहे. कीर्तनातून जीवनाचे धडे दिले गेले. लोकशाही विचारांची पेरणी त्यातून केलेली आहे. सामाजिक न्यायाचा पुरस्कार करून जे जुनाट, शोषणपूरक, अवहेलनाकारक ते ते धुडकावण्याचा महामंत्र हा कीर्तनाचा प्रधान हेतू आहे.

राबवणारे जग हे कीर्तनापुढे आहे. प्राणिमात्रांवर दया करण्याचा यांत विचार आहे. हे कीर्तन समानतेचा पुरस्कार करते. जगणे वागणे शिकवता शिकवता स्वाभिमान जागविण्याची प्रचंड ऊर्मी या कीर्तनात सामावलेली आहे. ''जेवणाचे ताट मोडा, झोपडीत राहा, कापडांवरचा खर्च कमी करा, मानपान टाळा; पण लेकरं शाळेत पाठवा; त्यांना वहीपेन घेऊन द्या-'' हा संदेश गरिबांच्या घरांत पोचविणारे संत गाडगेबाबा यांचे कीर्तन जीवन आणि भाषेचा उद्धारक महामंत्र आहे. आजही खेड्यांमधून, भजनांतून हे कीर्तन लोकांना ऐकवले तर लोकदृष्टी बदलेल, समाज बदलेल आणि जीवनभाषेचं मूल्य ठसठशीत नक्कीच होईल. ■

## शासनव्यवहारात मराठी

भारतीय संघराज्यातील घटक राज्यांमध्ये शासनव्यवहार आणि विधिमंडळाचे कामकाज तेथील लोकभाषेतून करण्यासाठी तिला कायद्याने राजभाषेचा दर्जा द्यावा लागतो. भारतीय राज्यघटनेच्या अनुच्छेद ३४५ मध्ये तरतूद आहे. त्या तरतुदीचा वापर करून राज्याच्या विधिमंडळाने महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ पारित केला. सदर अधिनियमान्वये मराठी भाषा महाराष्ट्र राज्याची राजभाषा झाली. राजभाषेचा दर्जा मिळाल्यानंतर राज्याचा शासनव्यवहार मराठी भाषेतून होणे अपेक्षित होते. त्याकरिता राजभाषा अधिनियमातील संबद्ध तरतूद लागू करणारी अधिसूचना काढण्यात आली व १ मे १९६६ पासून मराठीतून शासनव्यवहार करण्याचा मार्ग मोकळा झाला. मात्र, विधिमंडळाच्या कामकाजात मराठीचा वापर होण्यासाठी सदर अधिनियमांतील कलम ५ची तरतूद लागू करण्यासाठी १९९५चा स्वातंत्र्य दिन उजाडावा लागला. विशेष म्हणजे शासनव्यवहारात व विधिमंडळाच्या कामकाजात मराठीचा शंभर टक्के वापर व्हावा यासाठी राज्य शासनाने सदर अधिनियमांतील कलम ६ अन्वये नियम करणे आवश्यक होते, तो आजतागायत केलेला नाही.

-प्रकाश परब , दै० लोकसत्ता, १०.०९.२०१४

# बनारसी मराठी बोली

- प्रमोद पडवळ

बनारस शहराला काशी तसेच वाराणसी या नावानेही ओळखले जाते. देशाची सांस्कृतिक राजधानी तसेच धार्मिक नगरी म्हणून बनारस प्रसिद्ध आहे. शहरात साधारण ३०००च्या आसपास मराठी भाषिक समाज स्थायिक झालेला आहे. १७व्या शतकाच्या उत्तरार्धापासून मराठी समाज स्थलांतरित होऊन या ठिकाणी आलेला आहे. काशी हिंदू विश्वविद्यालयातील धर्ममीमांसा विभागाचे प्राध्यापक डॉ० माधव रटाटे मराठी भाषकांचे काशीतील अस्तित्व १३व्या शतकापर्यंत मागे नेतात. त्यांच्या मते संत ज्ञानेश्वरांबरोबर काशीयात्रेस आलेल्या मराठी समाजापैकी काही लोक काशीतच स्थायिक झाले. अर्थात डॉ० रटाटे यांच्या उपरोक्त मताला ठोस पुरावा सापडत नाही. शिवकाल तसेच पेशवे काळात मराठी समाज काशीत आला असावा. स्थलांतरितांमध्ये पुरोहित समाजाचे बाहुल्य आहे. ज्ञानार्जनाबरोबर धार्मिक हेतूने हे लोक आले असावेत. काशीतील ब्रह्माघाट, गायघाट, दशाश्वमेध घाट, दुर्गाघाट, पंचगंगा घाट, पक्का महाल घाट, पटनी टोला या भागात मराठी वस्ती जास्त आहे. वर उल्लेख केलेला परिसर गंगाकिनारी आहे.

बनारस शहरातील मराठी भाषिक समाजाचा समाज-भाषावैज्ञानिक अभ्यास करण्याच्या उद्देशाने एक प्रश्नावली तयार करण्यात आली. वेगवेगळ्या लिंग, वय, आर्थिक स्तर, शैक्षणिक स्तरांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या सुमारे १०० प्रतिनिधींची निवड केली. प्रश्नावलीतून विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे तपासून जी माहिती समोर आली ती अशी : महाराष्ट्रातील आपले मूळ स्थान माहीत असणाऱ्यांचे प्रमाण अत्यल्प आहे. ९५% लोकांना आपले मूळस्थान माहीत नाही. ज्यांना माहीत आहे ते कोकण हे आपले मूळ सांगतात. सर्वांचेच जन्मस्थान हिंदी क्षेत्रातील असूनही ते मराठीला आपली मातृभाषा मानतात. मातृभाषेसंदर्भात समजणे, बोलणे, वाचणे या स्तरावर स्वत:ला कुशल मानतात. लिखाणाचा स्तर मात्र सामान्य आहे. कुटुंब तसेच नातेवाइकांत संवाद साधताना मराठीचाच प्रयोग करतात. समारंभ, उत्सव यानिमित्ताने एकत्रित आलेला मराठी समाज प्राधान्याने मराठीचा वापर करतो. मराठी ही एक समृद्ध व प्रतिष्ठित भाषा आहे याचे भान सर्वांनाच आहे. काशीतील बहुसंख्यांची मातृभाषा हिंदी असल्याकारणाने सर्व व्यवहार हिंदीतून होतात. नोकरी तसेच व्यवसायाच्या निमित्ताने येथील मराठी भाषक हिंदीचा वापर करतात. बाजार तसेच बसस्थानकांसारख्या सार्वजनिक स्थानावर भोजपुरी या येथील स्थानिक





अनुक्रमणिका

बोलीचा प्रयोग करणारे मराठी भाषक संख्येने जास्त आहेत.

बनारसमधील मराठी भाषक पिढ्यान्‌पिढ्या येथे वास्तव्य करीत आलेला असूनही स्थानिक बहुसंख्यकांच्या भाषेच्या प्रभावाखाली त्यांनी मराठीचा त्याग केलेला नाही. ज्याप्रमाणे गुजरातमधील मराठी भाषक, इंदोरमधील मराठी समाज, दिल्लीतील बंगाली, मध्यप्रदेशातील मल्याळम आणि काशीतील तेलुगू, तमीळ, बंगाली समाजाने आपापल्या भाषांचे अस्तित्व टिकवून ठेवलेले आहे, त्याप्रमाणे काशीतील मराठी समाजाने मराठीला जिवंत ठेवलेले आहे. येथील मराठी भाषकांचे संपर्क जाळे व्यापक आहे. दैनंदिन जीवनात व्यवहार करत असताना अन्य भाषकांशी संपर्क ओघाने येतोच. शेजारी, मित्र, बाजार, नातेवाईक, कामाचे ठिकाण, प्रवास अशा वेळी येथील मराठी भाषकांचा संपर्क हिंदी, नेपाळी, बंगाली, तेलुगू, भोजपुरी इ० भाषकांशी येतो, त्याचा प्रभाव मराठी भाषकांच्या भाषेवर दिसून येतो.

परिवर्तीत पर्यायांचा विचार करता ध्वनी, शब्द आणि वाक्यरचनेच्या संदर्भात अनेक बदल दिसून येतात. हिंदी भाषकांच्या संपर्कात असल्याकारणाने हिंदीचा प्रभाव असणे साहजिकच आहे. हिंदी वर्णमालेत 'ळ' वर्ण नाही. 'ळ'साठी 'ल' हा पर्याय सर्रासपणे वापरला जातो. नवीन पिढीमध्ये याचे प्रमाण जास्त आहे. 'ज्ञ' आणि 'क्ष'चे उच्चारण हिंदीत मराठीपेक्षा भिन्न आहे. हिंदीच्या प्रभावाने वरील वर्णांचा उच्चार अनुक्रमे 'ग्य' आणि 'छ' असा होतो. 'च' आणि 'ज' चे उच्चारण मराठीत दोन प्रकारे होते. शब्दांनुसार हे उच्चारण बदलते - याचे भान येथील भाषकांना नसते. त्यामुळे नको त्या ठिकाणी नको ते उच्चारण होते. उदा० 'चांगला' ऐवजी 'च्यांगला'. हिंदी आणि मराठी व्याकरणात बरेच साम्य आहे. वाक्यरचना समान आहे. त्यामुळे यात फारसे दोष आढळून येत नाहीत. असे असले तरी कधी कधी मराठी क्रियापद हिंदीचे रूप घेऊन येते. त्याचप्रमाणे मराठी संभाषणात हिंदी शब्दांचा प्रयोग सर्रासपणे केला जातो. तरुण पिढीत याचे प्रमाण जास्त आहे.

वरील निरीक्षणे स्थूल आहेत. आणखी नमुने गोळा करून सूक्ष्म व सविस्तर अभ्यास केला जायला हवा. तसे झाल्यास नवीन तथ्ये समोर येतील यात शंका नाही.

■

**स्वागत**

मराठी नाटक आणि डॉक्टर प्रतिमा - डॉ० मधुरा कोरान्ते, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृ० २२०, किं० रु० २००/-

# 'नारायणपेठी' बोली

- अंबर ढगे

''स्वकुळ साळी/साळी'' हा विणकरांपैकीचा एक समाज आहे. हे लोक भगवान श्री जिव्हेश्वर यांना आपल्या समाजाचे दैवत मानतात. ह्या दैवताचा जन्म भगवान शंकरांच्या जिव्हेपासून झाला असल्याने त्यांस ''जिव्हेश्वर'' या नावाने संबोधले जाते आणि भगवान शंकराने देवादिकांना आणि समस्त पृथ्वीवरील लोकांना आपल्या शरीराच्या लज्जारक्षणाकरिता परिधान करण्यासाठी वस्त्राची निर्मिती करण्याचे काम ''जिव्हेश्वर'' यांच्यावर सोपविल्यामुळे, समस्त देवतांकडून त्यांचे नामकरण ''स्वकुळ'' आणि ''साळी'' अशा दोनही नावाचे झाले असल्याचे मानतात, म्हणून या समाजाच्या लोकांना ''स्वकुळ साळी/साळी'' जातीचे म्हणून ओळखले जाते. त्यामुळे साहजिकच हातमागावर वस्त्र निर्माण करणे हाच या समाजाचा मूळ व्यवसाय आहे.

ऐतिहासिक दृष्ट्या स्वकुळ साळी/साळी हा समाज मूलत: काशी क्षेत्रातील असल्याचे मानले जाते. कारण काशी क्षेत्रातील समस्त ब्राह्मण वर्गास दैनंदिन वापरास लागणाऱ्या सोवळ्याचे म्हणजे पितांबर वस्त्राचे, देवादिकांना परिधान करण्यासाठी हातमागावर रेशमी व सुती वस्त्र विणण्याच्या कामाचा अधिकार या समाजाच्या लोकांना तत्कालीन व्यवस्थेने प्रदान केला होता. त्यामुळे काशीक्षेत्र-परिसरातच या समाजाच्या लोकांची वस्ती होती असेही मानले जाते. अर्थातच याबाबतच्या ऐतिहासिक नोंदी, दस्तऐवज शोधण्याचे कार्य अभ्यासू वर्गाकडून अद्यापि चालू आहे.

नंतरच्या बदलत्या सत्तांतरानुसार हातमागावर वस्त्र विणण्याच्या अधिक कामाची गरज लक्षात घेऊन आणि तत्कालीन राजाश्रयानुसार ह्या समाजाचे लोक भारतभर पैठणी विणकाम कारागीर म्हणून विखुरले गेले. भारतामध्ये हातमागावर मोठ्या प्रमाणावर वस्त्रनिर्मिती हा प्रामुख्याने महाराष्ट्रातील पैठण, येवला, इचलकरंजी, सोलापूर, आंध्रप्रदेशातील नारायण पेठ, मेहबूबनगर, आदोनी, शहापूर, कर्नाटकातील हुबळी, धारवाड, गदवाल, बिदर, बेंगलोर, बेळगाव, गुजरातेतील अहमदाबाद, सुरत, नवसारी, भडोच आणि मध्यप्रदेशातील इंदौर, उज्जैन, भोपाळ, माहेश्वर इत्यादी ठिकाणी होत असे. म्हणूनच या ठिकाणी या समाजाच्या लोकांची वस्ती आढळून येते. साहजिकच, या समाजाचे लोक ते ज्या राज्यक्षेत्रात वस्तीस आहेत, त्या त्या राज्यांच्या प्रमाणभाषा अनुक्रमे, मराठी, तेलुगू, कन्नड, गुजराती व हिंदी या भाषा, व्यावसायिक गरज म्हणून





अनुक्रमणिका

उत्तम प्रकारे बोलतात.

त्यानंतरच्या औद्योगिक क्रांतीमुळे आणि यंत्रमागाच्या शोधामुळे हातमाग व्यवसाय धोक्यात येऊ लागल्यामुळे या समाजाच्या लोकांना नोकरी, शिक्षण, व्यवसायाच्या कारणास्तव पुन्हा मोठ्या प्रमाणावर भारतभर उदरनिर्वाहासाठी स्थलांतरित व्हावे लागले. त्यातल्या त्यात महाराष्ट्रातील प्रत्येक कानाकोपऱ्यातील शहरे, तालुका व ग्रामीण भागात मोठ्या प्रमाणावर ते स्थलांतरित झालेले आहेत. त्यामुळे हे सर्व लोक महाराष्ट्राची प्रमाणभाषा बोलतात. तथापि, आंध्रप्रदेशातील मेहबूबनगर या जिल्ह्यातील 'नारायण पेठ' या गावातील जे समाजबांधव महाराष्ट्रातील पुणे, सोलापूर, मुंबई या भागांत स्थलांतरित झाले आहेत. ते लोक प्रमाणभाषेव्यतिरिक्त 'नारायणपेठी' ही परंपरागत बोलीभाषा देखील बोलतात. ही बोली मराठी या प्रमाणभाषेशीच संबंधित आहे. मात्र ही बोली घराच्या उंबऱ्यापर्यंत एकमेकांशी संपर्कासाठी बोलली जाते. त्यामुळे भाषा-संस्कृतीच्या अभ्यासामध्ये ती अप्रकाशित राहिली आहे. याशिवाय सद्य:स्थितीत जे समाजबांधव आंध्रप्रदेशातील नारायणपेठ, आदोनी, शहापूर, कर्नाटकातील हुबळी, धारवाड, गदवाल, बिदर, गुलबर्गा, आळंद, बेंगलोर, बेळगाव आणि गुजरातेतील अहमदाबाद, नवसारी, सुरत, भडोच या ठिकाणी राहतात ते समाजबांधवसुद्धा त्या त्या राज्याच्या प्रमाणभाषेव्यतिरिक्त, 'नारायणपेठी' ही बोलीभाषा आपापल्या उंबऱ्यापर्यंतच एकमेकांशी संपर्कात राहण्यासाठी आजही बोलतात. अशी ही 'नारायणपेठी' बोलीभाषा, जी मराठी या राजभाषेशीच संबंधित आहे. ती आता या समाजाच्या लोकांमधील वाढत्या पिढीच्या अंतरामुळे आणि बदलत्या जीवनशैलीमुळे हळूहळू कमी होत चालली आहे; किंबहुना आता ती लुप्त होण्याच्या मार्गावर आहे. म्हणून या मराठी भाषेच्या बोली भाषेचे भाषिक सर्वेक्षण करून त्याची नोंद व दस्तऐवजीकरण करून घेणे आवश्यक वाटते. कारण ह्या बोलीचा प्रश्न हा एक सामाजिक सांस्कृतिक प्रश्न आहे. तसेच या बोलीची लिपी ही देवनागरी लिपी आहे.

ही बोली बोलण्यास सहजसोपी, ऐकण्यास गोड, प्रेमळ व मवाळ आहे. ही निसर्गत: मनापासून व आपुलकीने बोलली जाते. अशा या मराठीच्या 'नारायणपेठी' बोली भाषेच्या स्वरूपादाखल पुढे नमूद केलेप्रमाणे या बोलीतील शब्द, म्हणी, वाक्प्रचार, वाक्य, पत्रव्यवहार इत्यादीबाबतही माहिती देत आहे.

**काही शब्द**

| नारायणपेठी बोली | मराठी | नारायणपेठी बोली | मराठी |
|---|---|---|---|
| माझू | माझे | लडली | रडली |
| असू | असे | लेवाड, लवाड | उशीर |

काही शब्द

| नारायणपेठी बोली | मराठी | नारायणपेठी बोली | मराठी |
|---|---|---|---|
| तुझू | तुझे | निवद | नैवेद्य |
| काय झालू | काय झाले? | देवू | देव |
| दल्ला | नवरा | कैस | कशाला |
| पऊँ | पाय | कटे | कुठे |
| डै | डोके | दिल्लास | दिलात |
| दुखालै | दुखते | रोग उट्टो | रोग होऊ दे |
| फुर्गान | फुगवून | मडू उचलो | मढं उचलू दे |
| येड लागलू | वेड लागले | मायती | माहेर |
| पैर | पोरगी | साँसती | सासर |
| हमास | आम्हाला | मायतेंवू | माहेरचे |
| तिमास | त्यांना, त्याला | सासतेंचू | सासरचे |
| बरु | बरे | जंवई | जावई |
| देक | बघ | कटून | कोठून |
| कैस | का, कशाला | पाटे | उद्या |
| जेवलम् का? | जेवलात का? | दिस | दिवस |
| का करतीस? | काय करतेस? | पळणा | बारसे |
| नै | नाही | नई | नाही |
| चकोट | सुंदर, चांगले | होई, हाँ | होय |
| फिरास | फिरायला | का करवाँ? | काय करावे? |
| आमचू | आमचे | बोलिला | बोलावणे |
| करलवूँ, करलोम | केले | मडकू | मडके |
| दिल्लवूँ, दिल्लोम | दिले | गुडी | देऊळ |

### काही शब्द

| नारायणपेठी बोली | मराठी | नारायणपेठी बोली | मराठी |
|---|---|---|---|
| रंदप/रंधप | स्वयंपाक | करलई, करलोम | केलोय |
| झमकाना | सतरंजी | मेणशा | मिरची |
| भकर | भाकरी | वंगी | वांगी |
| आदण | रस्सा | एवढू | एवढे |
| वरदला | ओरडला | तेवढू | तेवढे |
| पौस | पाऊस | थोडू | थोडे |
| पवास | पायाला | अध्धिक | अधिक |
| कसू | कसे | तेने | तो |
| तिप्पल | कष्ट | तिने | ती |
| लिवलू | लिहिली | गोट | गोष्ट |
| धकटू | धाकटा, लहान | उभरलाय | उभा आहे |
| धोरलू | थोरला, मोठा | उंचणी | उलथणे |
| सरलई | संपले | होई | होय |
| उरलई | उरले | मज | मला |
| त्याचू | त्याचे | तुज | तुला |
| तीचू | तिचे | त्यांस | त्यांना |
| सावलू | साडी | तुम्हे | तुम्ही |
| वाढणू | वाटप | आम्हे | आम्ही |
| तंब्या | तांब्या | कासो | कोणते |
| चाटू | चमचा | भगानू | पातेले |
| मिळ्ळू | मिळाले | अधरंटी | अर्धवट |
| वाटलावने, वाटलाव | पाठविणे | वड्डीक | टाईट |
| सरकू | सारखे | फिसनाशी | चेंगट |
| अलैत | आलेत | हंडामंड | हेकेखोर |
| गेलैत | गेलेत | | |

वाक्प्रचार

| | |
|---|---|
| १. बुडूख अंधार झालु | दाट काळोख पडला. |
| २. पैर पसंत पडली, घट्ट झालू | मुलगी पसंत पडली, साखरपुडा झाला. |
| ३. हातान एक दमडा नै, तिथे जाऊन का ऊद घालवाँ | स्वत:जवळ एक पैसा नाही तर काय बोलणी करायची. |
| ४. नेन्ता पोप्पु हाय का? | अजाण, लहान मूल आहे का? |
| ५. सगळेच तोंडान ऱ्हावाँ, कोणचे दातात नसवाँ | सगळ्यांच्या तोंडी आपले नाव असावे, कोणाचा आपल्यावर रोष नसावा. |
| ६. शाळा शिकून पालथू पड रे म्हटले तर कुत्री मारत हिंडालाय | शाळा शिकून मोठा हो म्हणालो तर नुसता भटकतोय. |
| ७. पैले आम्हांस मोकळू कर | प्रथम आमचा न्यायनिवाडा करा |
| ८. नुसतु घुम्मन घुसक्या हैस, धन्न म्हणेणा | नुसता गप्प राहतोय, तोंडून ब्र निघेना. |
| ९. डै फोडून घेवाँ का? | डोके फोडून घ्यावे का? |
| १०. तुम्हांस का करवै. आमचू हामे देखून घेतौ | तुम्हाला काय करायचेय, आमचे आम्ही पाहतो. आमच्या भानगडीत पडू नका. |
| ११. फंधे लावू नकोस | फाटे फोडू नकोस |
| १२. सकाळ पाटे पैशे मागास आलास, दाँतू तोडून देवाँ का? | सकाळी सकाळी पैसे मागण्यास आलास, दात पाडून द्यायचे का? उधारी कशी परत करू? |
| १३. पिळगी एक गोट ऐकेनात | मुले एकही गोष्ट ऐकेनात |
| १४. पाणी नै ते गाँवान मीठ लावून छाटवाँ | पाणी नाही तिथे नेऊन मारावे |
| १५. आता मज कामास जाँवई | मला आता कामाला जायचे आहे. |

म्हणी

| | |
|---|---|
| १. उटंगळ है, हिस काढवाँ नै, तिस ठूवाँ नै | धांदरट आहे हिला काढू नये, तिला ठेवू नये (दोघेही सारख्याच) |
| २. पैरीस अम्मा बा नै, म्हणून का झालु, आम्हे नै का ? | मुलीला आई-वडील नाहीत म्हणून काय झालं, आम्ही नाही का? |
| ३. एवढू सगळू केलू, ना नाम ना निशाणा | एवढे सगळे केले, पण नाव नाही. |
| ४. मनात आलू तर मल्लका, नै तर यल्लका | मनात आणले तर गोष्ट पूर्ण करणार, नाही तर नकार देणार |
| ५. टीच भर विणवाँ, पोटभर खावाँ | बोटभर विणावे, पोटभर खावे. |

''तेलंगणातील अरे-मराठा समाज-भाषा आणि संस्कृती'' (लेखक - श्रीधर रंगनाथ कुलकर्णी, भूतपूर्व प्रमुख, मराठी विभाग, उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद. प्रकाशक - म० रा० साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई) या संशोधन प्रबंधातील पान क्र० ५ वर स्वत:ची वैशिष्ट्यपूर्ण बोली असलेल्या ज्या अनेक जमाती तेलंगणात आढळून आल्या त्यामध्ये 'स्वकुळ साळी' या जातीचा उल्लेख करण्यात आलेला आहे.

हातमागावर विणकाम करणे, हाच पेशा असल्याने शैक्षणिक दृष्ट्या हा समाज अत्यंत मागासलेला आहे. त्यामुळे ह्या बोलीची लिखित लिपी जरी देवनागरी असली तरी या बोलीतील लिखित साहित्य, दस्तऐवज उपलब्ध होणे दुर्मिळच. तरी सुद्धा याच समाजातील काही बांधवांकडून या बोलीचे सर्वेक्षण, अभ्यास करण्याचा प्रयत्न आता सुरू झाला आहे.

या बोलीचा अभ्यास व संशोधनाचे कार्य याच समाजातील पुढील समाजबंधूंनी सुरू केले आहे : (१) श्री० अंबर रमाकांत ढगे (२) श्री० लक्ष्मण रामचंद्र लोणकर. या कार्यासाठी पुणे येथील सदरची बोली बोलणाऱ्या प्रौढ व वृद्ध बंधूभगिनींशी संपर्क साधून अधिक माहिती मिळविणे, नारायण पेठ, सादोनी, मेहबूबनगर (आंध्र प्रदेश), हुबळी, बेंगलोर, गुलबर्गा, आळंद (कर्नाटक) येथील समाजबांधवांशी या बोलीविषयक नवी-जुनी कागदपत्रे, गाणी, कथा, शब्द इत्यादींची माहिती त्यांचेशी पत्रव्यवहार व भ्रमणध्वनीद्वारे संपर्क साधून गोळा करणे इत्यादी कामे सुरू केली आहेत.

■

**'कॅचर' आणि 'कोसला'**

'कॅचर इन द राय' आणि 'कोसला'चा आत्मा सारखाच आहे, पण कोसला तत्त्वज्ञानाच्या अर्थाने खूपच वेगळी आहे. प्रथमपुरुषी निवेदनात्मक कादंबरीत निवेदकाची भाषा आणि नायकाच्या संवादाची भाषा यांतल्या सूक्ष्म बदलाची जाण मला 'कोसला'मध्ये अधिक आढळली; तर प्रथमपुरुषी निवेदनातदेखील तटस्थ प्रतिपादन करण्याचे 'कॅचर...'चे सामर्थ्य मला अचाट वाटते. 'कॅचर' जगण्याचे अन्वयार्थ मांडते, तर कोसला मृत्यूच्या तत्त्वज्ञानात शिरते. कोसलावरचा कॅचरचा प्रभाव नाकारण्याचा खुळेपणा मी करणार नाही; पण कोसलाची स्वतंत्र मौलिकता मी नजरेआड करू शकत नाही.

-संजय भास्कर जोशी, साप्ताहिक साधना, १४.०२.२०१५, पृ० २२

दखलयोग्य

# उच्चार आणि उमज

- अरुण टिकेकर

'रीडिंग अलाऊड' नावाचा एक प्रकार आम्हाला करायला सांगितला जाई. 'रीडिंग अलाऊड' म्हणजे आपण जे वाचत आहोत, ते स्वत:शीच मोठ्यांदा वाचणे. न्यायमूर्ती रानडे यांच्याबद्दल त्यांचे वर्गबंधू रावबहादूर मानकर यांनी एक आठवण सांगितली आहे. एल्फिन्स्टन कॉलेजच्या लायब्ररीमध्ये कोणाचा मोठा आवाज ऐकू येत आहे, हे पाहण्यासाठी कॉलेजचे प्रिन्सिपॉल अलेक्झांडर ग्रांट तिथे आले. आसपासचे भान विसरून आरामखुर्चीत विसावून मोठमोठ्यांदा वाचन करणाऱ्या महादेवाला (नंतरचे माधवराव) पाहून 'ओऽ! ग्रेट गॉड!' असे म्हणत, 'त्याला डिस्टर्ब करू नका' असे इतरांना सांगत ते निघून गेले. मोठ्यांदा वाचले तर चटकन ध्यानात येते, असा स्वानुभव असल्याने रानडे प्रत्येक कागद स्वत:शीच मोठ्यांदा वाचत, असे नमूद आहे. नंतरच्या आयुष्यात अगदी न्यायालयीन कागदपत्रेसुद्धा ते मोठ्यांदा वाचत.

एकट्याने वाचताना ते मोठ्यांदा वाचावे ही पूर्वी शिक्षकांची तसेच घरच्यांची शिकवण होती. तसे केल्याने काय होते, मनातल्या मनात का नाही वाचायचे, असे प्रश्नही आम्हाला त्या वेळी पडत नव्हते. असेल त्यामागे वडीलधाऱ्यांचे काहीतरी धोरण, असे वाटे आणि ते तसे होते हे कळायलाही वेळ लागला. मोठ्यांदा वाचायचे तर सारे लक्ष वाचनावर केंद्रित करावे लागते, त्यामुळे अन्य बाबींकडे ध्यान जाऊन चित्त विचलित होत नाही. मनाचे व्यवधान सुटत नाही. सुटले तर वाचन आपोआप थांबते. म्हणजे वाचले ते उमजायचे व्यवस्थित. याचाच अर्थ अभ्यास चांगला व्हायचा. हा झाला एक लाभ. पण त्याहीपेक्षा दुसरा महत्त्वाचा फायदा म्हणजे उच्चार आपोआप व्यवस्थित व्हायचे. जिभेला वळण लागायचे. एखाद्या शब्दाचा आपला उच्चार कोठे चुकतो हे कळायला मदत व्हायची.

एक मात्र होते. आपण मोठ्यांदा वाचत असताना आपल्या चुकीच्या उच्चारावर इतर कोणी हसले तर ओशाळल्यासारखे होत असते. मॅसकर (massacre) (=कत्तल) याचा उच्चार 'मास-एकर' केला, तर कानाला तो विचित्र वाटतो ना? आजच्या विद्यार्थ्यांना तसे वाटत असेलच असे खात्रीपूर्वक सांगता येत नाही. आजच्या 'निर्ढावलेल्या' जमान्यात किती मंडळी नॅशनल अर्काइव्हज् (म्हणजे राष्ट्रीय अभिलेखागाराला) अर्काइव्हज् म्हणतात? ॲलेझांडरचा उच्चार 'अलेक्झांडर' असा न करता 'अलेक्जांडर' असा करतात ? या व अशा उच्चारातील चुका खटकेनाशा झाल्या की, पुढची पायरी ऱ्हस्व-दीर्घाच्या चुकांची आहे. 'काय फरक पडतो ऱ्हस्व किंवा दीर्घ लिहिल्यामुळे? आमचे लेखन थोडेच ऱ्हस्व-

दीर्घसाठी वाचले जाते? काय म्हणायचे आहे ते तुम्हाला कळले की झाले!' ही बेफिकिरीच मराठी भाषेच्या अवनतीस कारणीभूत होत आहे. अशी अनास्था एका बाजूला आणि दुसऱ्या बाजूला एकदम बंडाचे निशाण ! 'ती तुमची उच्चभ्रू भाषाच प्रमाण का ? आणि प्रमाण भाषा हवीच कशाला ? काही गरज नाही तिची. आम्ही आमच्या रांगडेपणालाच जपणार,' हे दुसरे टोक. भाषेला प्रमाण हे असलेच पाहिजे. मगच त्या 'ग्रॉथिक' प्रमाण भाषेचे अनेकविध बोली-अवतार समजण्यास, त्यांचीही गम्मत चाखण्यास मजा येते, हे जागतिक साहित्य-संस्कृतीचे सत्य मानायलाच आज आपण तयार नाही.

त्यामुळे चुकांची बोचणी संपली. चूक झाल्यास ओशाळलेपण येई ते येईनासे झाले. आपल्या उच्चारात आणि लेखनात होणाऱ्या चुकांचे काही वैषम्य वाटेनासे झाले की भाषेची आबाळ सुरू होते. मातृभाषा असो, राष्ट्रभाषा असो की जागतिक भाषा, बोलण्यात वा लेखनात आपल्याकडून झालेल्या किंवा इतरांनी केलेल्या चुका कुसळासारख्या खटकेनाशा झाल्या की समाजाच्या त्या भाषेच्या प्रकृतीविषयी काळजी वाटण्यासारखीच परिस्थिती निर्माण होते. मग ती भाषा ज्ञानेश्वर-तुकारामांनी एकेकाळी समृद्ध केलेली असली तरी.

इतरांच्या लिहिण्या-बोलण्यातील चुका ध्यानी येणे म्हणजे एखादी भाषा शिकण्याची प्रवेश-परीक्षा उत्तीर्ण होणे, असे आम्हाला शालेय जीवनात सांगितले गेले. दुसरा टप्पा होता - 'लिसन् व्हाइल यू स्पीक, स्पीक व्हाइल यू लिसन्' हा. 'बोलावे तसेच ऐकावे, ऐकावे तसेच बोलावे.' इंग्रजीसारखी परकीय भाषा (आता ती किती परकीय राहिली आहे, याची शंकाच आहे!)

नुसते 'मराठीत बोला' म्हणून भाषा सुधारते का? चांगली मराठी ऐकायला पण पाहिजे. त्यासाठी 'चांगली मराठी' म्हणजे कोणती हे कळायला तर पाहिजे. चांगली मराठी म्हणजे भटाळलेली नव्हे. चांगली मराठी म्हणजे चांगल्या वक्त्याची किंवा लेखकाची मराठी. मग तो लेखक शहरी असो, ग्रामीण असो, कोल्हापुरी-सोलापुरी बोलणारा असो, वऱ्हाडी-वैदर्भी बोलणारा असो. लेखकाचे कसून, भाषेवर जबरदस्त मेहनत घेऊन निर्मिलेले वाङ्मय मोठ्यांदा वाचण्याची सवय जडली की भाषिक मर्यादा आपोआप ओलांडल्या जातात आणि चांगले वाङ्मय कोणते, टिकावू कोणते, टाकाऊ कोणते, हे ध्यानी येऊ लागते. कारण चांगल्या साहित्याचे एक महत्त्वाचे लक्षण हे आहे की लेखनातील शब्दमाधुर्य वाचणाऱ्याच्या कानात योग्य आवाज करते. एकोणिसाव्या शतकात इंग्लंडमध्ये 'रीडिंग अलाउड' ही एक कला मानली गेली. आपल्याशीच मोठ्यांदा वाचताना उत्कृष्ट वाङ्मयकृतीतले भाषिक सौष्ठव ध्यानी येते, शब्दांचे नादमाधुर्य कानात घुमते, असे मानले गेले. खरेच आहे, शेक्सपियरच्या सुनिताची आणि त्याच्या नाटकांतील स्वगतांची गोडी आणि शब्द-सौष्ठव तसेच नाद-माधुर्य अनुभवायला ती मोठ्यांदाच वाचली पाहिजेत. ■

[ दै० लोकमत, दि० १७.०२.२०१३ ]

# डेक्कन कॉलेजमधील विविध स्तरांवरील भाषाशास्त्रासंबंधीचे उपक्रम (२०१३-१४)

- ऋता पराडकर, शुभांगी कर्डिले

भाषाशास्त्राचे आज तांत्रिक, शैक्षणिक आणि सामाजिक क्षेत्रांमध्ये मोठ्या प्रमाणावर उपयोजन होत आहे. पण तरीही, सर्वसामान्यांच्या मनात या विषयाच्या क्लिष्टतेबद्दल काहीशी भीती आहे. या विषयात उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनाही आपले संशोधन तज्ज्ञांसमोर मांडून त्यात सतत सुधारणा करण्याची गरज भासते. भारतात भाषाशास्त्रीय अभ्यासाची मुळे रुजवणाऱ्या डेक्कन कॉलेजच्या भाषाशास्त्र विभागातर्फे या संदर्भात पुढाकार घेऊन, विद्यार्थी तसेच भाषाशास्त्राबद्दल जिज्ञासा असणाऱ्या सर्वांसाठी अनेक उपक्रम राबवले जात आहेत.

### आंतरराष्ट्रीय मातृभाषा दिवस

२१ फेब्रुवारी हा जगभरात आंतरराष्ट्रीय मातृभाषा दिवस म्हणून साजरा केला जातो. या दिवसाचे औचित्य साधून डेक्कन कॉलेजच्या भाषाशास्त्र विभागाने प्रगत शिक्षण संस्थेच्या डॉ० मॅक्सीन बर्नसन यांचे व्याख्यान २०१४ मध्ये आयोजित केले होते. डॉ० बर्नसन या 'मातृभाषेतून शिक्षण' या संकल्पनेच्या पुरस्कर्त्या व शिक्षणक्षेत्रातील एक प्रयोगशील व्यक्तिमत्त्व म्हणून ओळखल्या जातात. व्याख्यानाच्या सुरुवातीला त्यांनी मातृभाषा दिवसाचे महत्त्व विशद केले.

'मातृभाषेतून शिक्षण' म्हणजे काय याबद्दल मुळातच संभ्रम आहे. मातृभाषा म्हणजे प्रमुख प्रादेशिक भाषा असे गृहीत धरून शिक्षणाचे धोरण आखले जाते, परंतु यामुळे छोट्या प्रमाणावर बोलल्या जाणाऱ्या, विशेषकरून आदिवासी भाषा बोलणाऱ्या मुलांवर प्रमुख प्रादेशिक भाषा लादल्या जातात हा मुद्दा त्यांनी ठळकपणे मांडला.

इंग्रजी व प्रादेशिक भाषा यांच्यात शिक्षणाचे माध्यम म्हणून होणाऱ्या स्पर्धेविषयी त्या बोलल्या. एका अभ्यासानुसार, सुमारे २९% ग्रामीण मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळांत शिकतात. इंग्रजीच्या या वाढत्या प्रभावाची कारणे त्यांनी स्पष्ट केली. शिक्षण हीच मध्यमवर्गीयांची संपत्ती असते. इंग्रजीचे आर्थिक मूल्य अफाट आहे व त्यामुळेच इंग्रजीकडे मध्यमवर्गाचा ओढा जास्त आहे. शासनाचे धोरणही इंग्रजीच्या वाढीसाठी पूरक ठरले आहे. सन २००० मध्ये महाराष्ट्र शासनाचा 'पहिलीपासून इंग्रजी सक्तीची' करण्याचा नियम याचेच उदाहरण आहे. यामुळे इंग्रजीचे महत्त्व अवास्तव वाढल्याचे त्यांनी सांगितले.

शिक्षणाचे माध्यम मातृभाषा का असावे हे त्यांनी निरनिराळे मुद्दे मांडून स्पष्ट केले. त्यांच्या त्या संदर्भातील प्रयोगांचे अनुभवही त्यांनी सांगितले. मातृभाषेतून मनमोकळा संवाद साधणे मुलांना शक्य होते. एखादे मूल शाळेत जाते तेव्हा त्याच्याकडे मातृभाषेतील शब्दसंख्या जवळपास ४,०००च्या घरात असते. मातृभाषेतून शिक्षण घेणाऱ्या ग्रामीण मुलांचे अनुभवविश्व शहरी मुलांपेक्षा प्रचंड समृद्ध असते. नैसर्गिकपणे व्यक्त होण्यासाठी मातृभाषाच, माध्यम म्हणून योग्य असल्याचे त्यांनी सांगितले.

दिल्ली विद्यापीठाशी संलग्न महाविद्यालयात अध्यापन केलेल्या डॉ० मीनाक्षी मुखर्जींनी मातृभाषेतून शिकलेल्या व मातृभाषेतून न शिकलेल्या अशा दोन गटांचे निरीक्षण केले. त्यातून त्यांना असे दिसून आले की इंग्रजी माध्यमातून शिकलेल्या विद्यार्थ्यांची भाषेवरील पकड चांगली असली, तरी साहित्याची उत्तम जाण प्रादेशिक भाषांमधून शिकलेल्या विद्यार्थ्यांकडे होती. सांस्कृतिक परंपरेशी जास्त चांगली ओळख असल्यामुळे हा फरक दिसून येतो. सध्याच्या शिक्षणपद्धतीत मुलांचा भाषिक विकास व्यवस्थित होत नाही. एका संस्थेतर्फे करण्यात आलेल्या सर्वेक्षणातून दिसून आले की इ० पाचवीच्या बहुतांश मुलांना इ० दुसरीचीही पुस्तके वाचता येत नाहीत. शिक्षणक्षेत्राबद्दलची अनास्था याला कारणीभूत आहे. शिक्षक-प्रशिक्षण अभ्यासक्रमात भाषा अध्यापनाच्या साधनांचा फारसा विचार होत नाही. भाषा अध्यापनशास्त्राची मार्गदर्शक तत्त्वे पाठ्यपुस्तके तयार करताना पाळली जात नाहीत. वर्षानुवर्षे तीच पाठ्यपुस्तके अद्ययावत न करता वापरली जातात. या सर्व गोष्टींचा विचार करता, भाषावैविध्याला सामावून घेणारे, सर्वसमावेशक आणि अद्ययावत असे शिक्षणधोरण आखणे आवश्यक आहे.

व्याख्यानानंतर झालेल्या चर्चेत उपस्थितांनी सहभाग घेतला. या कार्यक्रमास अक्षरनंदन, ज्ञानप्रबोधनी, सेंटर फॉर लर्निंग रिसोर्सेस (पुणे), मराठी अभ्यास परिषद अशा प्रयोगशील संस्थांचे प्रतिनिधी उपस्थित होते. तीन-चार भाषा एकत्र शिकण्याचे फायदे/तोटे, भाषा आणि स्व-प्रतिमा यांचा संबंध अशा मुद्द्यांचा ऊहापोह या चर्चेत झाला. कार्यक्रमाच्या शेवटी संस्थेचे अध्यक्ष डॉ० देगलूरकर यांचे भाषण झाले. भाषाशास्त्र विभागाचे डॉ० शैलेन्द्र मोहन यांनी सर्वांचे आभार मानले.

**मराठी संपर्कभाषाशास्त्र या विषयावर कार्यशाळा**

मराठी ही एक वेगळी भाषा म्हणून ओळखली जाण्याच्या काळापासून तिचा भारतातल्या कानडी, तेलुगू, हिंदी, गुजराती या भाषांशी संपर्क आहे. मराठी प्रामुख्याने महाराष्ट्रात बोलली जाते. महाराष्ट्र-कर्नाटक सीमाभागात मराठी-कन्नडा, महाराष्ट्र-आंध्रप्रदेश सीमाभागात मराठी-तेलगु, महाराष्ट्र-मध्य प्रदेश सीमाभागात मराठी-हिंदी, महाराष्ट्र-गुजरात सीमाभागात मराठी-गुजराती असा भाषासंपर्क पहायला मिळतो. त्याचबरोबर आदिवासी भाषा आणि मराठी असाही भाषासंपर्क पहायला मिळतो. वर्षानुवर्षाच्या द्विभाषिकतेतून

या भाषांमध्ये शब्दांच्या आणि व्याकरणाच्या पातळ्यांवर देवाणघेवाण होते. नागपूर, सोलापूर, यवतमाळ, नांदेड या भागांतील मराठीच्या बोली या मराठीशी हिंदी, कन्नडा, तेलुगू यांच्याशी संपर्क येऊन तयार झाल्या आहेत. या भाषासंपर्काबरोबरच ऐतिहासिक काळात काही मराठी भाषक महाराष्ट्राबाहेर स्थायिक झाल्यामुळे मराठीचा हिंदी (मध्य प्रदेश, उत्तर प्रदेश), कोंकणी (गोवा), तमिळ(तंजावुर, तामिळनाडू), कन्नडा (कर्नाटक), तेलुगू (आंध्र प्रदेश) या भाषांशी संपर्क आला आहे. यातूनच 'आरे मराठी' (आंध्र प्रदेश) 'तंजावूर मराठी' (तमिळनाडू) अशा मराठीच्या महाराष्ट्राबाहेर बोलल्या जाणाऱ्या बोलीभाषा अस्तित्वात आल्या आहेत.

या दोन्ही प्रकारच्या भाषा-संपर्कांचा भाषाशास्त्रीय आणि सामाजिक-भाषाशास्त्रीय अंगाने अभ्यास या भाषाशास्त्र विभागाने सुरू केला आहे. हा अभ्यास विद्यापीठ अनुदान आयोगाच्या विशेष साहाय्य योजनेच्या ('स्पेशल असिस्टंस् प्रोग्रॅम'च्या) 'भारतातील भाषा-संपर्क' या उपक्रमांतर्गत सुरू आहे. 'भाषा-संपर्क' या विषयावर २०१२ साली एका राष्ट्रीय तर २०१३ साली एका आंतरराष्ट्रीय चर्चासत्राचे आयोजन विभागाने केले होते. या अभ्यासाचा अजून एक टप्पा म्हणून १४-१५ मार्च २०१४ या काळात एक कार्यशाळा विभागाने आयोजित केली.

या कार्यशाळेच्या पहिल्या भागात महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील मराठी-कन्नड, मराठी-तेलुगु, मराठी-हिंदी, मराठी-तमिळ, मराठी-कोलामी, मराठी-कोकणी, मराठी - भिली, मराठी-कोरकू या भाषासंपर्कांवर काम करणाऱ्या अभ्यासकांनी आपले काम सादर केले. यात मराठीचा हिंदी, गुजराती यांसारख्या तिच्या भाषाभगिनींशी (एकाच भाषाकुलातील भाषा) आणि कन्नड, तेलुगुसारख्या वेगळ्या भाषाकुलातील भाषांशी संपर्क असे दोन उपविभाग होते. महाराष्ट्रातील मराठीशी संपर्कात असलेल्या कोलामी, नहाली, भिली, पावरीसारख्या आदिवासी भाषांचा संपर्क आणि या संपर्काचा या भाषांवर होणारा परिणाम यावरदेखील एक सादरीकरण झाले.

दुसऱ्या भागात भाषासंपर्काच्या अभ्यासासाठी उपयुक्त अभ्यासपद्धती, आवश्यक अशा भाषाशास्त्रीय सामाजिक-भाषाशास्त्रीय माहितीचे स्वरूप, त्या संबंधीच्या प्रश्नावल्या आणि त्यांचे स्वरूप यावर ऊहापोह झाला. वर उल्लेख केलेल्या मराठीशी निगडित भाषासंपर्कांच्या अभ्यासात एक समान कार्यपद्धती तयार झाली तर त्यामुळे त्यांच्यात तुलना होऊ शकेल. या तुलनात्मक अभ्यासातून भारतातील भाषासंपर्काचे स्वरूप, त्यातील समानता आणि फरक हे स्पष्ट होऊ शकेल. तसेच कुठल्या भाषासंपर्काच्या परिस्थितीत द्विभाषिकता टिकते, कुठल्या परिस्थितीत दोनपैकी कोणती भाषा लोप पावून कोणती भाषा टिकते, कुठल्या परिस्थितीत दोन भाषांची सरमिसळ होऊन एक नवीन भाषा तयार होते या प्रश्नांची उत्तरे मिळू शकतील.

या कार्यशाळेसाठी इलिनॉय, अमेरिका येथील इलिनॉय विद्यापीठातील प्रा० राजेश्वरी पांढरीपांडे यांची विशेष उपस्थिती होती. या कार्यशाळेत सहभागी झालेले अभ्यासक आणि त्यांच्या निबंधांचे विषय पुढे दिले आहेत : सोनल कुलकर्णी-जोशी ('मराठीशी संबंधित असलेल्या भाषासंपर्कांच्या उपलब्ध अभ्यासाचा एक आढावा') व ('भाषावार राज्यांच्या निर्मितीनंतरचा दक्षिण महाराष्ट्रातील मराठी-कन्नडा संपर्क'), कलिका मेहता ('महाराष्ट्रातील गुजराती-मराठी आणि मारवारी-मराठी भाषासंपर्क'), राहुल म्हैसकर ('नागपुरी मराठी'), ऋता पराडकर ('गोव्यातील पद्ये बोलीवर कोंकणीचा प्रभाव'), दिगंबर घोडके ('सोलापूर शहर आणि भोवतालच्या परिसरातील भाषासंपर्क आणि द्विभाषिकता'), शुभांगी कर्डिले ('महाराष्ट्रातील यवतमाळ व नांदेडमधील मराठी-द्रविड भाषासंपर्क'), वारीचा निर्बेल ['भलावली भाषा' (कोंकणी-कन्नडा)], मानसी केळकर ('मराठी-तमिळ भाषासंपर्कांच्या अनुषंगाने सध्याची तंजावूर मराठी'), सुजाता भुजंग ('दौलताबादमधील मराठी व हिंदी-उर्दू भाषासंपर्क'), शैलेन्द्र मोहन (आदिवासी भाषा आणि मराठी यांचा संपर्क आणि त्यामुळे या भाषांवर होणारा परिणाम). ■

---

## मुद्रणदोष - दुरुस्ती

पावसाळा (जुलै-ऑक्टोबर २०१४) अंकातील पुढील मुद्रणदोष सुधारून घ्यावेत अशी विनंती आहे.

| पृष्ठ व ओळ | असे आहे | असे हवे |
|---|---|---|
| ०१ अनुक्रमणिका | स्नेहल कुलकर्णी-जोशी | सोनल कुलकर्णी-जोशी |
| २३ खालून ७वी ओळ | रूपातंर | रूपांतर |
| ४६ परिच्छेद ३, ओळ ३ | बोलावावयाचे | बोलवायचे |
| ४९ (शीर्षकाच्या वर सदराचे नाव राहिले) | | महाजालावरील मराठी |
| ५८ शेवटची ओळ | दै०लोकसत्ता | दै०सकाळ २२.०२.२०१४ |
| ६० खालून ६वी ओळ | अधिकाअधिक | अधिकाधिक |
| ६७ वरून ९वी ओळ | विद्यापाठातून | विद्यापीठातून |
| ६७ वरून १०वी ओळ | ('सामाजिक'नंतर स्वल्पविराम नको) | |
| ६७ वरून १०वी ओळ | महाविद्यालयात | महाविद्यालय |
| ६८ वरून ५वी ओळ | गोडाबोले | गोडबोले |
| ६८ वरून ८वी ओळ | अगंदा | अंगदा |
| मलपृष्ठ (शीर्षक) | मुखपृष्ठाविषयी | मुखपृष्ठांविषयी |
| मलपृष्ठ वरून १३वी ओळ | झुराळाप्रमाणे | झुरळाप्रमाणे |

# महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक २०१४

**- विवेक सबनीस**

''कोणत्याही भाषेच्या भाषाविषयक गरजा हेरून त्या अनुषंगाने कोश लिहिला तर तो नक्की खपतो. पण यासाठी कोशकाराची सैद्धांतिक बैठक तसेच भाषा-संस्कृती व ज्ञानरचना याचेही त्यास भान असायला हवे. कारण शेवटी कोशवाङ्मय हा त्या भाषेचा आरसा असतो,'' असे प्रतिपादन ज्येष्ठ भाषावैज्ञानिक डॉ० रमेश धोंगडे यांनी केले. पाच खंडांमधील 'संकल्पना कोशा'च्या कार्याबद्दल डॉ० धोंगडे यांच्या हस्ते सुरेश पांडुरंग वाघे यांना महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार देण्यात आला त्या वेळी ते बोलत होते.

कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्र० ना० परांजपे होते. महाराष्ट्र बँकेच्या सहयोगाने देण्यात येणाऱ्या या पुरस्कारात पाच हजार रुपये रोख आणि सन्मानपत्र यांचा समावेश आहे. परिषदेने २०१२ आणि २०१३मध्ये प्रसिद्ध झालेल्या भाषाविषयक लेखनाचा विचार करून वर्ष २०१४चा पुरस्कार वाघे यांच्या 'संकल्पना कोश (खंड १ ते ५)' या ग्रंथाली प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या या ग्रंथाची पुरस्कारासाठी निवड केली.

केमिकल इंजिनियर असणाऱ्या वाघे यांनी सलग ३२ वर्षे घेतलेल्या ध्यासातून हा कोश तयार झाला. त्याचे संपादन ज्येष्ठ समीक्षक आणि मराठीचे अभ्यासक जयवंत चुनेकर यांनी केले. काल, घटनाक्रम, तर्कसंगती आणि समानार्थी शब्द देताना वाघे यांनी एकंदर अकरा क्षेत्रे निवडली असून त्यांच्यातील संकल्पनांचा परिचय या कोशातून देण्यात आला आहे.

आपल्या विवेचनाचा रोख कोशशास्त्रावर ठेवत डॉ० धोंगडे म्हणाले की, ''शब्दकोश आणि संकल्पनाकोशातील फरक तपासून पाह्यला हवा. तसेच कोशाचा आवाका आणि क्षमता ही कोशकारावर अवलंबून असते, म्हणून कोणताही कोश हे एका माणसाचे काम नसून त्याची व्याप्ती आणि अर्थघनता वाढण्यासाठी सांघिक प्रयत्नांची आणि तज्ज्ञांच्या सहभागाची गरज आहे. त्यातून त्या कोशाचे धोरण ठरवता येते. तसेच त्याचा वापर करणारा कोण आहे हेही माहीत असायला हवे. कोशासाठी पुरेसा शब्दसाठा किंवा 'डेटाबेस'ही असायला हवा, तसेच त्यातल्या संकल्पना स्पष्ट असायला हव्यात.''

''कोशवाङ्मयात मराठीतले बहुतेक सगळे कोश हे एकांड्या शिलेदारांच्या प्रयत्नांनी झाले असले तरी तीच त्यांची मर्यादाही आहे,'' असे सांगून प्रा० परांजपे म्हणाले की, ''आजच्या घडीला ज्ञानकोश आणि विश्वकोश हे कालबाह्य होत असताना वाघे यांनी





अनुक्रमणिका

तयार केलेला संकल्पना-कोश लोकांचे लक्ष वेधून घेईल, असा विश्वास वाटतो. मराठी कोशवाङ्मयात मोल्सवर्थ आणि दाते-कर्वे यांचा अपवाद वगळता बाकीचे सर्व कोश हे एकाच व्यक्तीच्या प्रयत्नांतून तयार झाले आहेत, तीच या कोशांची मर्यादा आहे. अशा व्यक्तींना संस्थांचे पाठबळ मिळाले असते तर त्यांची व्याप्ती आणखीन वाढली असती. वाघे यांचा कोश हा निश्चितच उपयुक्त असला तरी त्याचा वाचक नेमका कोण आहे, हे अजून स्पष्ट व्हायचे आहे.''

''आपला संकल्पनाकोश तज्ज्ञांसाठी नसून तो सर्वसामान्यांना उपयोगी ठरेल,'' असे सांगून वाघे म्हणाले की, ''मूळ संकल्पना आणि त्यासाठी लागणारे समानार्थी शब्द वापरून हा कोश तयार करण्यात आला असून त्यात विस्तव व ज्वाला यांना इतर समानार्थी शब्द, तसेच शब्दांची मूळ उत्पत्तीही सांगितली आहे. मराठीत ५० ते ६० बोलीभाषा असून त्यातले समानार्थी शब्द देण्याचा आपण या कोशातून प्रयत्न केला आहे. असे असले तरी हा कोश परिपूर्ण आहे, असा माझा दावा नसून कोणताच कोश हा परिपूर्ण नसतो.''

या कार्यक्रमात डॉ० कल्पना कुलकर्णी यांनी प्रास्ताविक केले, तर या संकल्पना कोशाची निवड करण्यामागची भूमिका डॉ० विद्यागौरी टिळक यांनी मांडली. आनन्द काटीकर यांनी सूत्रसंचालन केले.

■

**प्रतिसाद**

# पैसाअडका

**- सुरेश वाघे**

'भाषा आणि जीवन', पावसाळा (जुलै) २०१४ अंकातील अरविंद कोल्हटकर ह्यांच्या 'पैसाअडका!' या लेखात मोहरेत शुद्ध सोने १४९.७२ ग्रॅम असल्याचा उल्लेख आहे. (संदर्भ : हॉब्सन-जॉब्सन) (पृ० ५७३). वस्तुत: ते १४९.७२ ग्रेन वजन आहे. त्या वेळी भारतात मेट्रिक पद्धत नव्हती. २४ ग्रेन ट्राय वजन = १.५५५१७ ग्रॅम ह्या हिशेबाने १४९.७२ ग्रेन = ९.७० ग्रॅम वजन होते. ब्रिटिश पद्धतीत सोने, रत्ने वगैरे मूल्यवान वस्तू ट्रॉय वजनात तर इतर वस्तू ॲव्हारड्यूपॉइस वजनात तोलतात. (ऑक्सफर्ड डिक्शनरी).




# राज्य मराठी विकास संस्था

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महानगरपलिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई ४००००१.
दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ फॅक्स : २२६५३९६६




प्रशासनिक मराठी भाषेचा विकास, (पु०मु०) गीता भागवत, ₹ २७५
कोश व सूची वाङ्मय : स्वरूप आणि साध्य (पु०मु०) सरोजिनी वैद्य, ₹ २७५
मराठी लेखन मार्गदर्शिका (पु०मु०) यास्मिन शेख, ₹ ८०
मराठी लघुलेखन शब्दकोश (पु०मु०) व०वा० इनामदार, ₹ १४०
विज्ञान संकल्पना कोश (पु०मु०) रा०वि० सोवनी, ₹ २५०
शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम (पु०मु०) वा०ब० पटवर्धन/रमेश पानसे, ₹ ३९६
मराठी भाषा : वाढ आणि बिघाड (पु०मु०) श्री०के० क्षीरसागर, ₹ २२५
वृद्धि: भाषेचे व भाषाभ्यासाचे विकसन (पु०मु०) दिनेश द० माहुलकर, ₹ ३७६
भाषा - आपली सर्वांचीच, अविनाश बिनीवाले, ₹ १५०
महाराष्ट्र साहित्य परिषद, म०श्री० दीक्षित, ₹ १२०
व्याकरणकार मोरो केशव दामले : व्यक्ती आणि कार्य (पु०मु०) कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, ₹ १००
काकासाहेब कालेलकर : व्यक्ती आणि कार्य, मृणालिनी जोगळेकर, ₹ १५०
गंगाधर बाळकृष्ण सरदार : व्यक्ती आणि कार्य, हेमंत वि० इनामदार, ₹ ६०
बालगंधर्व : व्यक्ती आणि कार्य, मोहिनी वर्दे, ₹ ६०
मातृसेवा संव. विनया खडपेकर, ₹ ६०
सकाळ वृत्तपत्र आणि वृत्तसमूह (पु०मु०) स्वाती सुहास कर्वे, ₹ १२५
शंतनुराव किर्लोस्कर : व्यक्ती आणि कार्य, भा०र० साबडे, ₹ १६०
डॉ० अ०का० प्रियोळकर : व्यक्ती आणि कार्य, वि०बा० प्रभुदेसाई, ₹ १५०
त्र्यंबक शंकर शेजवलकर यांच्या साहित्याची वर्णनात्मक सूची, सुषमा पौडवाल, ₹ १५०
त्रिवेंद्रमची मराठी हस्तलिखिते (पु०मु०) वसंत जोशी, ₹ ५०
मद्रासची मराठी हस्तलिखिते (पु०मु०) वसंत जोशी, ₹ १५०
हैदराबादची मराठी हस्तलिखिते, श्री०रं० कुलकर्णी व इतर, ₹ १००
कर्नाटकची मराठी हस्तलिखिते, भीमाशंकर देशपांडे, ₹ १५०
तंजावर सूची (खंड सहावा), भीमराव केसकर, ₹ २००
दक्षिण भारतीय मराठी वाङ्मयाचा इतिहास - तंजावर खंड, वसंत जोशी, ₹ ५००
दक्षिण भारतातील वाङ्मयाचा इतिहास - आंध्र-कर्नाटक खंड, वसंत जोशी व द०दि० पुंडे, ₹ ५००
दाक्षिणात्य साहित्य संस्कृतीचा मराठीशी अनुबंध, माणिक धनपलवार, ₹ ३००
साहित्यसेतू, श्री०रं० कुलकर्णी, ₹ ४५
दखनी भाषा : मऱ्हाटी संस्कृतीचा एक आविष्कार, श्री०रं० कुलकर्णी, ₹ ४५
करुणाष्टक - व्यंकटेश माडगुळकर, विनायक नारायण सप्रे, ₹ ७५
राजमाची का बुधा, गो०नी० दांडेकर/ मीरा नांदगावकर, ₹ ७५
बिंदिया जितनी झील, निर्मला देशपांडे/ सुनीता परांजपे, ₹ १००
कल्याणी, ज्योत्स्ना देवधर, ₹ ७५
मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे, माधव कोंडविलकर/ अविनाश बिनीवाले, ₹ १५०

दिन ब दिन. शं०ना० नवरे/ सुभाष रणदिवे, ₹ १००
साँस भर का फासला. अंबिका सरकार/ शरयू पेडणेकर, ₹ १००
श्रीमती रमाबाई रानडे. मा०श्री० विद्वांस/ वासंतिका पुणतांबेकर, ₹ ११०
मैं कृतार्थ हुई - मेहरून्निसा दलवाई/ विजया, ₹ ११०
रोहिणी - केशव केळकर/विलास गिते, ₹ १००
बौद्धिक संपत्ती अधिकार - विशाल कटारिया/अनु० अनिता जोशी, ₹ २५
यंत्रालयाचा ज्ञानकोश. शंकर गोपाळ भिडे, ₹ १,६००
मराठी ग्रंथसूची भाग १ व २. संपा० शंकर गणेश दाते, ₹ २,६००
मराठी ग्रंथसूची भाग ३ (१९५१-६२), शरद साठे, ₹ १,०००
मराठी ग्रंथसूची भाग ४ (१९६३-७०), शरद साठे, ₹ १,१००
मराठी ग्रंथसूची भाग ५ (१९७१-७८), शरद साठे, ₹ १,६००
मराठी विज्ञान ग्रंथसूची. रा०वि० सोवनी, संजीवनी शिंत्रे, ₹ १५०
मराठी वैद्यक ग्रंथसूची. सुरेश नाडकर्णी/ कविता महाजन, ₹ १२५
मराठी कोश व संदर्भ साधने यांची समग्र सूची. वसंत कुलकर्णी, ₹ २००
वस्त्रनिर्मिती माहिती कोश खंड १ - तंतुनिर्माण व तंतुविज्ञान. ₹ ४००
वस्त्रनिर्मिती माहिती कोश खंड २ - सूतनिर्माण, ₹ ५००
वस्त्रनिर्मिती माहिती कोश खंड ३ - कापडनिर्माण, ₹ ५००
शिक्षणाचे अंतरंग (पु०मु०), लीला पाटील, ₹ ३५५
फार्सी-मराठी व्युत्पत्तिकोश, यु०म० पठाण, ₹ ६००
पालघर तालुका - बोली समाज व संस्कृती, प्रतिभा कणेकर, ₹ ६५०
दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोश. प्र० खंड, डॉ० गंगाधर पानतावणे, ₹ ३५०
दलित-ग्रामीण साहित्य : रूढी.प्रथा.परंपरा. विधिकोश डॉ० गंगाधर पानतावणे, डॉ० अशोक सोलनकर, ₹ ५६२
महाराष्ट्राचा भाषिक नकाशा, रमेश धोंगडे. अशोक सोलनकर, ₹ ५३०
का? आणि कसे ?. अनु० संध्या पाटील-ठाकूर, ₹ १५५
कृष्णाकाठ - यशवंतराव चव्हाण आत्मचरित्रात्मक पुस्तकाची ऑडियो सीडी ₹ १००
श्रीदासबोध - श्री समर्थ रामदास स्वामी ऑडियो सीडी (५ सीडी संच), ₹ २५०
दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोश, द्वि० खंड, डॉ० गंगाधर पानतावणे, ₹ ३५२
वस्त्रनिर्मिती माहितीकोश - खंड ४ - रासायनिक प्रक्रिया, कैं०वा० अचवल, ₹ १४२०
स्वातंत्र्यापासूनचे भारताचे राजकारण, अनु० अ० दातार/ वि० घोटाळे, ₹ ३५६
प्राचीन आणि मध्ययुगीन भारतीय धातुशास्त्राचा संक्षिप्त इतिहास, प्रवीण प्र० देशपांडे ₹ १६०
तारकांशी मैत्री, अनु० प्रदीप नायक, ₹ ३२९
भारतीय इतिहासातील काही अभ्यास विषय, जा० वांबूरकर-उटगीकर, ₹ ४१८
मराठी ग्रंथसूची भाग ६ (१९७९-८५), शरद साठे, ₹ १,३९६

**आगामी प्रकाशने :** (१) भारतातील सामाजिक परिवर्तन आणि विकास (२) शालेय मराठी शब्दकोश (३) वस्त्रनिर्मिती माहितीकोश खंड ५. (४) कुशाग्र बुद्धीचा डी०एन०ए० (५) मराठी ग्रंथसूची खंड ७ (६) दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोश (प ते ह-खंड ३). **सर्व पुस्तकांवर २०% सवलत.**

संस्थेचे संकेतस्थळ : http://rmvs.mahatashtra.gov.in / ई-पत्ता : rmvs_mumbai@yahoo.com

**लेखक-परिचय**

■ **ढगे,** अंबर रमाकांत **:** बी०ए०, सहकार व लेखा पदविका, निसर्गोपचार पदविका. शासकीय सेवेतून (वित्त व लेखा विभाग) राजपत्रित अधिकारी (वर्ग १) म्हणून निवृत्त, 'जिव्हेश्वर समाचार' या मासिकाचे काही काळ कार्यकारी संपादक.

टपाल-पत्ता : प्लॉट क्र० 30, विणकर सोसायटी, पद्मावती, पुणे 411043.

चलभाष : 094047 39154

■ **देवळेकर,** सुशान्त : एम०ए० (मराठी), सध्या राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) येथे कनिष्ठ संशोधन-साहाय्यक ह्या पदावर कार्यरत. मराठी 'शब्दबंध' हा शब्दार्थसंबंध दाखवणारा कोश व मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी 'रूपविश्लेषक' ही संगणक प्रणाली विकसित करण्यात सहभाग. संगणकावर युनिकोड वापरून मराठीत काम कसे करता येईल हे समजावून देणाऱ्या कार्यशाळांत मार्गदर्शन.

टपाल-पत्ता : D-605, सुबोधनगर वसाहत, श्रीप्रस्थ चौथा मार्ग, निळेमोरे. नालासोपारा, ता० वसई, जि० ठाणे 401 203, चलभाष : 097698 35310

■ **देशपांडे,** प्रदीप गोपाळ : एम०ए०, सरस्वती भुवन महाविद्यालय. औरंगाबाद येथून इंग्रजीचे प्राध्यापक व विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. हिंदी, उर्दू, इंग्रजी व मराठी या भाषांमधून व या भाषांमध्ये अनुवाद. निस्सीम इसिकेल यांच्या 'लेटर डे साम्ज' या कवितासंग्रहाच्या 'आधुनिक स्तोत्रे' या अनुवादास साहित्य अकादेमीचे पारितोषिक. 'काझी सलीम यांची कविता' हा अनुवाद मेहतातर्फे प्रकाशित.

टपाल-पत्ता : 4, देवी लक्ष्मी अपार्टमेंट्स, प्लॉट 67, दत्तमंदिराजवळ, विद्यानगर, जालना रोड, औरंगाबाद 431005. चलभाष : 098223 52653

■ **देशमुख,** केशव सखाराम : एम०ए०,पीएच०डी०. नांदेड येथील स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठात मराठी विभाग-प्रमुख. पाच वर्षे भाषा, वाङ्मय व संस्कृती संकुलाचे संचालक. काही काळ अधिष्ठाता. विद्यापीठांच्या व उच्च माध्यमिक मंडळांच्या पाठ्यपुस्तकांचे संपादन. मराठवाडा साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य. 'पाढा', 'अथक' व 'अनवाणी' हे तीन कवितासंग्रह. 'फ०मुं० शिंदे यांची काव्यप्रतिभा' हा समीक्षा ग्रंथ.

टपाल-पत्ता : मराठी विभाग-प्रमुख, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड 431606. चलभाष : 094227 21631

■ **पडवळ,** प्रमोद **:** एम०ए०,पीएच०डी०. काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या मराठी विभागात साहाय्यक प्राध्यापक.

ई-पत्ता : 0pbpadwal@gmail.com स्थिरभाष : 0542 - 6703087

■ **प्रभुदेसाई,** विद्या **वासुदेव :** एम०ए०, एम०फिल०, पीएच०डी०. पी०ई० सोसायटीचे महाविद्यालय, फोंडा (गोवा) येथे मराठीच्या विभाग-प्रमुख. अनेक नियतकालिकांतून संशोधनपर लेख प्रकाशित.

टपाल-पत्ता : पी०ई० सोसायटीचे महाविद्यालय, फोंडा, गोवा. चलभाष : 09422061000

■ **बागूल,** फुला : दोन पीएच०डी०. ('देशभक्तिपर कविता' व 'मराठी विज्ञान साहित्य' या दोन विषयांवर प्रबंध). गुर्जर बोलीवर विद्यापीठ अनुदान आयोगासाठी संशोधन. अहिराणी साहित्याची समीक्षा. तीन कवितासंग्रह, दोन अन्य ग्रंथ. शिरपूर (जि० धुळे) येथील वरिष्ठ महाविद्यालयात प्राध्यापक.

टपाल-पत्ता : 32, गणेश कॉलनी, शिरपूर (जि० धुळे) 425405.

चलभाष : 094206 05208

■ **मराठे,** सुधाकर : एम०ए०,पीएच०डी०. पुणे, नॉर्थ वेल्स व कॅनडा येथे शिक्षण. फर्गसन महाविद्यालय, पुणे विद्यापीठ, केंद्रीय इंग्लिश आणि परकीय भाषा संस्थान. (हैदराबाद), नॉर्थ-ईस्टर्न हिल युनिव्हर्सिटी, युनिव्हर्सिटी ऑफ हैदराबाद इ० ठिकाणी अध्यापन. आता निवृत्त. 'कोसला' (भालचंद्र नेमाडे), 'पाचोळा' (उद्धव शेळके), 'महर्षी विठ्ठल रामजी शिंदे' (गो०मा० पवार), 'गोंडे पाणी आणि इतर ग्रामीण कथा' (व्यंकटेश माडगूळकर) या पुस्तकांचे व अनेक कवितांचे इंग्रजीत भाषांतर. सच्चिदानंद मोहन्तीच्या 'शिकार' या ओडिया कथेच्या भाषांतराला 'कथा' अनुवाद पारितोषिक.

टपाल-पत्ता : 5-6, गार्डन फ्लॅट्स. 22. चिंतामणी सोसायटी. कर्वेनगर. पुणे 411052.

चलभाष : 083088 21290

■ **मोहनी,** दिवाकर : मुद्रणतज्ज्ञ. लिपीतज्ज्ञ. विवेकवादाला वाहिलेल्या 'आजचा सुधारक' या नियतकालिकाच्या संपादक-मंडळाचे सदस्य.

टपाल-पत्ता : 'गौरीनंदन'. 123. शिवाजीनगर. नागपूर 440010.

चलभाष : 098819 00608

■ **सरदेसाय,** माधवी : एम०ए०.एम०फिल०. (भाषा विज्ञान). 'भाषाभास' (१९९३). 'मंथन' (२०१२) हे दोन लेखसंग्रह प्रकाशित. भाषांतर व स्वतंत्र लेखन यासाठी साहित्य अकादमीची दोन पारितोषिके. गोवा विद्यापीठाच्या कोंकणी विभाग-प्रमुख. 'जाग' या कोंकणी मासिकाच्या संपादक. गतवर्षी (२०१४) कर्करोगाने कालवश.

■ **सार्वेकर,** कैलास : एम०ए०,पीएच०डी०. नवापूर (जि०नंदुरबार) येथील कला. वाणिज्य महाविद्यालयात मराठीचे प्रपाठक व विभागप्रमुख. का०स० वाणी मराठी अध्ययन संस्थेचे (धुळे) मानद संचालक, एम०फिल० व पीएच०डी०साठी मार्गदर्शक. 'आमची श्रीवाणी' या नियतकालिकाचे सहसंपादक. 'बालभारती' (इ० पहिली) व 'कथामाला' या पुस्तकांचे संपादक. 'मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास'. 'वेध : तळ्यातल्या साउल्यांचा'. 'तहान : स्वरूप आणि समीक्षा' हे ग्रंथ प्रकाशित. स्थिरभाष : (0257) 2251951

चलभाष : 094215 68959 ई-पत्ता : ksarvekar@gmail.com

---

## विलंबाबद्दल क्षमस्व

'भाषा आणि जीवन'चा पावसाळा, २०१४ (जुलै-सप्टेंबर) आणि दिवाळी (ऑक्टोबर-डिसेंबर) २०१४ या अंकांना असाधारण विलंब झाला याबद्दल आम्ही वर्गणीदारांची क्षमा मागतो. पावसाळा अंक जानेवारी २०१५मध्ये आला व प्रस्तुतचा दिवाळी अंक मार्च २०१५ अखेरीस. त्यामुळे नियत कालावधीनंतरच्या घटनांचाही त्यांमध्ये समावेश झाला आहे. कृपया गैरसमज करून न घेता उदार मनाने क्षमा करावी. ही विनंती. -संपादक

Book Packet Containing Periodical, बुकपोस्ट - बु
आर.एन.आय. नोंदणी क्र. Q-40048/83, ISSN 2231-4059 Marathi Abhyas Parishad Pa



**मराठी अभ्यास परिषद पत्रिका**

वर्ष ३२ । अंक ४ दिवाळी २०१४
मूल्य ₹ ४०/-

**प्रेषक**

कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
मराठी विभाग, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे 411 004
चलभाष क्र. - 09421610704
e-mail: marathi.abhyas.parishad@gmail.com



